साहित्य सत्कार प्रकाशन ९ वें.

# हवेल्या

—: लेखक :—

प्रल्हाद रघुनाथ इंगळे,
बी. एस्सी., एल्एल्. बी.



प्रथमावृत्ति

सप्टेंबर १९४१

किंमत १। रुपया.

## पहिल्या पायरीवरून —

प्रख्यात लेखकांच्या लघुकथासंग्रहांनीं अगोदरच गजबजलेल्या वाङ्मयप्रांतांत आणि कुंद झालेल्या वातावरणांत आज ह्या 'हवेल्या' मी बांधल्या आहेत. मध्यें उभं राहून चोहोंबाजूला दूरवर विस्तीर्ण-पणें पसरलेल्या लघुकथांच्या सुंदर इमारती दिसत असूनसुद्धां माझ्या 'हवेल्या' कडे क्षणभर कां होईना पण वाचकवर्गाची दृष्टी जाईल याच केवळ आशेनें मी हा माझा पहिलाच लघुकथासंग्रह वाचकांसमोर ठेवण्याचें धाष्टर्य केलें आहे.

या कामीं कोल्हापूरच्या 'साहित्य-सत्कार' संस्थेचे सन्मान्य चालक आणि माझे स्नेहि श्री. वि. आ. हर्डीकर यांनीं माझ्यासा-रख्या नवोदित लेखकाची ही पहिलीच कलाकृति आपुलकीनें फार श्रम घेऊन प्रकाशित केली त्याबद्दल ते, कव्हरवरील सुंदर न् अर्थ-पूर्ण चित्र काढून देणारा माझा शाळासोबती अज्ञातमित्र आणि या पुस्तकप्रकाशनाच्या कामीं बहुमोल मदत करणारे माझे कोल्हापूर येथील स्नेही या त्रयींचा मी अत्यंत आभारी आहें.

त्याचप्रमाणें माझ्या अगदीं निकट सहवासांतील ज्या प्रेमळ व्यक्तीनें माझ्या लेखनकार्यांत मला वेळोंवेळीं प्रोत्साहन देऊन माझ्या लघुकथा संग्रहित स्वरूपांत प्रकाशित करण्याची आपुलकीच्या भाव-नेनें सूचना केली आणि जरूरतर आर्थिक मदतही करण्याची इच्छा दर्शविली त्याबद्दल त्या प्रेमळ व्यक्तीचेही मी आभार मानतों.

इतरहि कांहीं मित्रांनीं मला वेळोवेळीं ज्या सूचनां केल्या आणि या पुस्तकाच्या कामींहि अन्य रीतीनें जें बहुमोल सहाय्य केलें त्याब-

द्दल त्यांचा आणि ज्या निरनिराळ्या नियतकालिकांतून माझ्या लघु-कथा प्रसिद्ध केल्या गेल्या त्यांच्या संपादकवर्गाचाही मी फार आभारी आहें.

शेवटीं माझ्यासारख्या नवोदित लेखकाच्या ह्या पहिल्याच कलाकृतीचा वाचकवर्ग प्रेमानें व आनंदानें स्वीकार करील अशी आशा प्रदर्शित करून मी माझे चार शब्द पुरे करतों.

६२, हिन्दु कॉलनी,
दादर-मुंबई १४.

आपला,
प्रल्हाद इंगळे.

---

# १ : : जमीन आणि अस्मान

ओढ्याच्या कांठीं ती कपडे धूत होती.

धूत असलेले लुगडं वर उचलतेवेळी तिच्या तोंडून साहजिकच 'स्... स्...' असे उद्गार निघत.

जणूं काय हृदयांतील दुःखित भावनांचें दिग्दर्शनच.

आणि वर उचललेलं लुगडं तिने जोरानं खालीं पाण्यांतील दगडावर आपटावं.

जणूं काय दैन्यावस्थेच्या खडकावर आपटलेलं आपलं दैवच.

आणि लुगड्याचा दगडाशीं संयोग होताच लुगड्यातील पाणी चोहों-बाजूला उडे.

'आपल्या जीवनाच्या अशाच ठिकऱ्या उडाल्या नाहीं का?' तिच्या मनांत विचार येई.

कितीतरी वेळ ती पाण्यांत उभी राहून कपडे धूत होती.

चेहऱ्यावर उत्पन्न होत असलेले मोठमोठाले घर्मबिंदू मधूनमधून ती हातानें पुसून टाकी आणि वाऱ्यानं भुरभुरणारे डोकीवरील कुरळे केस चेहऱ्यावर पसरून त्रास देऊं लागत त्यावेळीं त्यांनाहि ती उजव्या हातानं मागं सारी.

धुतलेले कपडे ती बाजूलाच ठेवलेल्या टोपलींत टाकत होती.

एकादं लुगडं धुवून झालं कीं, ती शिल्लक राहिलेल्या कपड्याच्या ढिगाऱ्याकडे खिन्न नजरेनें पाही अन् पुन्हा आपल्या कामास लागे.

—ओढ्याच्या बाजूनें तोहि चालला होता. त्यानें तिच्याकडे पाहिलें अन् तो आपल्याशींच हंसला.

किती सुंदर दिसत होती ती त्यावेळीं !

त्यानं पाहिलें.

सौंदर्याची प्रतिमा होती ती. कपडे धुतेवेळीं तिचं अवनत मुख पुष्कळ वेळां वर होई अन् त्यावेळीं तिचा उन्नत उरोभाग स्पंदनामुळें त्याच्या नजरेला फारच विलोभनीय दिसत होता. खालच्या वर्गात जन्मलेली असूनसुद्धां तिचं गोरपान सस्मित मुखमंडळ फार सुंदर दिसत होतें. ओढ्याच्या काठावरील झाडाच्या मधूनमधून होणाऱ्या हेलकाव्यामुळें सूर्याचे किरण ज्यावेळीं तिच्या चेहऱ्यावर पसरत त्यावेळीं जागोजागीं थबकलेले घर्मबिंदू चटकन् चमकत आणि त्यामुळे एक प्रकारचा मधुर भाव तिथं उमटलेला त्याला दिसे. [redacted] होता. पाण्यांत उभी राहिल्यामुळे तिनं आपलं वस्त्र पायावरून वर गुडघ्यापर्यंत खोंवल्यामुळें तिच्या भरीव पोटऱ्या फारच आकर्षक दिसत होत्या. शरीराचा एकंदर सुदृढ व सुबक बांधा, अंगची गौर व सतेज कांति, कपडे धुण्याची तिची त्यावेळची पद्धत, तिच्या पायांखालून व आजूबाजूनें संथपणें वहाणारें ओढ्याचें निर्मल पाणी आणि सभोंवतालची एकंदर निसर्गशोभा त्याच्या कलात्मक नजरेला फारच सुंदर वाटली.

तो तिथंच एका दगडावर बसला आणि तिचं चित्र रेखटण्यास त्यानें सुरवात केली.

तो आपलं चित्र काढीत आहे याची कल्पनाहि नव्हती बिचारीला.

  

आंतरराष्ट्रीय चित्रप्रदर्शनांत त्याला त्या चित्राबद्दल पहिलें बक्षिस

मिळालें. कमिटीनें त्या चित्राची आणि चित्रकाराची फार प्रशंसा केली. वर्तमानपत्रांचे मथळे त्याच्या फोटोनीं, चरित्रांनीं आणि मुलाखतीनीं भरून निघाले आणि एका संस्थानिकानें त्याच्या चित्रकलेवर अन् विशेषतः त्या चित्रावर खुष होऊन परदेशांत चित्रकलेचा पुढील अभ्यास करण्यासाठीं शिष्यवृत्तीहि दिली.

—आणि तो परदेशीं जात होता.

सारी मित्रमंडळी, आप्तनातलग त्याला "सेन्ड ऑफ" देण्यासाठीं बॅलर्ड पिअरवर जमले होते. मातृभूमीस विनम्रपणें वंदन करून त्यानें हिंदुस्थानचा किनारा सोडला.

—आणि त्याचवेळीं ती ओढ्याच्या कांठीं कपडे धुणारी मोलकरीण मालकाचे दरदिवशींचें कपडे नेहमींप्रमाणें धुवून परतत होती.

तिच्या जीवनावर तो चित्रकार आज परदेशगमन करीत होता.

जणूं काय तिचं जीवन हीच त्याची कला.

पण तिचं जीवन !

आणि—

त्याची कला !

दोहोंमध्यें केवढं अंतर !

ज्योत्स्ना—फेब्रुवारी १९४०

---

## २ : :                    नकळते भाव

खरं पाहिलं असतां शशीकांत कॉलेजमध्यें प्राध्यापकाची नोकरी करायचा आणि त्यानं तसं करावं असं मलाहि वाटे. चांगला पुण्याच्या ॲग्रिकल्चर कॉलेजमधून बी.एजी. ची परिक्षा यशस्वी रीतीनें वरच्या नंबरास पास झालेला व त्यानंतर परदेशगमन करून शेतकीखात्यांत विशेष प्राविण्य संपादन करून आलेला, कॉलेजमध्यें प्रोफेसर म्हणून नेमणूकहि झालेली, पण कां कुणास ठाऊक, त्यानें आपल्या उच्च शिक्षणाचा उपयोग स्वतःच्या वतनवाडींत करण्याचा निश्चय करून त्याप्रमाणें तो अलिबागजवळील आपल्या गांवीं जाऊन राहिलासुद्धां. त्याच्या प्रत्येक मित्राला अन् विशेषतः मला त्याच्या या करण्याचं फार आश्चर्य वाटलं व मनास फार वाईटहि वाटल. त्यानं तसं करूं नये असं मी त्याला कितीदां तरी बजावलं पण उपयोग झाला नाहीं.

त्याची मुंबईच्या जवळच अलिबागच्या बाजूस कुठंशी वतनवाडी होती. शशी उमदा तरुण होता. नेहमीं हंसरा चेहरा, पिळदार शरीर, पाणीदार डोळे, भव्य भालप्रदेश आणि प्रत्येकाच्या मनांत आपलेपणाची भावना उत्पन्न करणारी मुद्रेवरील खेळकर समाधानी वृत्ति. मी त्याचा जिवलग दोस्त होतों.

त्याचं चार पांच महिन्यापूर्वीच लग्न झालं होतं. त्याची सरला खरोखरच सरळ, मनमिळाऊ होती. मी दर दोन दिवसांनीं शशीच्या घरीं गेलो कीं तिच्याबरोबरच गप्पा कराव्या. शशीकांत शेतांत अगर दुसरीकडे कामावर असायचा. मला फार आवडायची सरला. पण तिच्याविषयीं माझ्या मनांत अभिलाष उत्पन्न झाला नाहीं. प्रणयाची भावना शिवली नव्हती आणि विषयवासनेला थारा दिला नव्हता. ती सुंदर होती, आकर्षक होती अन् प्रेमळ होती. जिवलग दोस्ताची प्रेमळ सरला, या उदात्त भावनेपलीकडे माझी दृष्टी गेली नव्हती.

किती निष्पाप पोरगी ती ! अन् माझ्याशीं गप्पागोष्टी करतांना किती मोकळेपणानं बोलायची ती माझ्याशीं ! पाठीवरून भुजंगाप्रमाणें डोलणारी ती वेणी, किंचित् लाबट चेहरा, आकर्षक बांकदार भुंवया, पाणीदार तेजस्वी डोळे, चाफेकळीसारखं नाक, अरुंद जिवणी, गुलाबी ओठांतून मोत्याप्रमाणं चमकणारी दंतपंक्ती, अन् त्याच वेळीं गालाला इवल्याशाच पडणाऱ्या खळया, या साऱ्या गोष्टी साहजिकपणें दिसणाऱ्या तिच्या नाजुक अंगसौष्ठवाला शोभा आणीत.

मी शशीच्या घरीं गेलों कीं ती मला विचारी, " शशी घरीं कसा मिळेल तुम्हास या वेळीं ? " आणि मी, " पण तुम्ही बोलाल कीं नाहीं माझ्याशीं ? " असं म्हणून खुर्चीत बसलों कीं ती आपली मान किंचित् कलती करून म्हणे, " मी बोलणारच नाहीं तुमच्याशीं ! "

" कां ? " मी विचारी.

" तुम्ही माझ्याशीं बोलण्यास आला नाहीं ना ? " असें ती म्हणे अन् चटकन् गालांतल्या गालात हंसून माझ्याकडे पाही.

मला फार मजा वाटे तिच्या बोलण्याची. माझ्या जिवलग दोस्तास अशा प्रकारची प्रेमळ सरला मिळाल्याबद्दल कधीं कधीं माझ्याहि मनांत असूयेचे विचार येत पण ते क्षणभरच !

त्या दिवशीं मी शशीकडे गेलों होतों. शशी—सरलेचा सिनेमाला जाण्या न जाण्याबद्दल वादविवाद चालला होता. मी आंत शिरतांच सरला चटकन् आपल्या जागेवरून उठली आणि म्हणाली " शशी, हें

पहा आले प्रभाकर ! विचारा त्यांना येतांहा कां म्हणून ?" आणि शशी-कडून येणाऱ्या उत्तराची वाटहि न पहातां ती मला म्हणाली, "प्रभाकर येतां ना तुम्हीं सिनेमाला ? चला जाऊं या !"

"कुठल्या ?" मी साहजिकच विचारलं.

"दुनिया—न माने ! येता ना ? चला."

आणि माझ्या मूकवृत्तीचा अर्थ 'मी येत आहे !' असा करून काय बरं आनंद झाला सरलला ! किती आनंदांत होती त्या वेळीं ? आणि त्या आनंदी वातावरणांत किती सुंदर दिसत होती ती !

त्याच्या दुसऱ्याच दिवशीं शशीस मुंबईस जायचं होतं व मला बोलावण्यासाठीं तो माझीच वाट पहात होता कीं काय न कळे ! कारण मी आंत शिरतांच तो चटकन् आपल्या जागेवरून उठला अन् म्हणाला, "हॅलो प्रभा, चल येतोस ना मुंबईला ?" आणि त्यानं डोकीवर हॅटहि चढविली.

"कशासाठीं रे ! न् सरला येत नाहीं ?" मी चटकन् विचारलें.

"नाहीं येत ती" त्यानं एक मोठासा उसासा टाकून म्हटलें,—

"मग मी विचारतों ना ? येईल ती." असं म्हणून मी सरलेला सांगण्यास आंत जाणार होतों, तों शशीनें माझा रस्ता अडवला व म्हटलं, "चल, तूं न् मीच जाऊं ! मला पुष्कळसं तुला सांगायचं आहे !" त्यानं ओढीतच मला बाहेर आणलं व आम्हीं दोघेच मार्गास लागलों.

हँगिंग—गार्डनच्या एका टोंकास मी न् शशी बसलों होतों ! जवळच एक लहानसं मूल खेळत होतं. साहजिकच शशीचं लक्ष तिकडे गेलं. त्यानं चटकन् माझ्या खांद्यास हात लावला अन् म्हटलं, "पहा, प्रभा, त्या मुलाकडे पहा ! किती आनंदानं बागडतं आहे तें मूल ! त्याला दुःखाची किंचित् तरी कल्पना आहे का ? आज घडत असलेल्या सुखाच्या काळांत तें मूल आनंदानें डुंबत आहे. उद्या संसाराचा भार पडल्यावर त्याच मुलाला असलं निर्भेळ सौख्य लाभेल कां ?—आणि पहा त्या कामगार लोकांकडे !" त्यानं जवळच झाडांची साफसफाई करणाऱ्या लोकांकडे पाहून म्हटलें. "किती कष्ट करताहेत ते ? अन् कशासाठीं तूं विचारशील ? प्रभा, या जगतावरील प्रत्येक प्राणी चालू असलेल्या

स्थितीपेक्षां उच्चत्तर स्थितीला पोहचण्याचा प्रयत्न करीत असतो. आणि शेवटीं त्याला काय मिळतं ?--पोटापुरती मीठभाकर ! पण तेवढ्याशा त्या चतकोर भाकरीनं किती आनंदांत असतात ते !

प्रभा, जीवन हाच जर आनंद असतां, समाधान हेंच जर सुख असतं, तर भूतलावरील सारे लोक आनंदीच बनले असते. सौख्याची कल्पना श्रीमंतींत नाहीं. सुखाचा संसार धनदौलतीवर अवलंबून रहात नसतो. सुखमय इमारत वैयक्तिक विचारांच्या भरभक्कम पायावर उभी असते. प्रभा, म्हणूनच हे शेतकरी लोक मीठभाकरीवर जीवनाचा आनंद लुटतात. पण प्रभा, माझ्या जीवनाकडे पहा ! नीट नजर लाव. काय दिसतं तुला ? प्रभा, मला कांहीं एक समजत नाहीं. शून्य भासतं सारं जग. मला वाटतं मला कांहीं समजूं नये अशीच माझी जीवनाची दुर्दैवी घटना असली पाहिजे नाहींतर प्रभा, माझी सरल माझ्याशीं अशी कां वागावी ! प्रभा, तुला माहित नसेल कोणत्या स्थितींत आमचं मीलन झालं. कॉलेजात असतानांच माझं तिच्यावर प्रेम जडलं. मला ती फार आवडूं लागली. तिलाहि माझ्याशीं बोलावसं वाटे. मी सारे प्रयत्न केले. निरनिराळे उपाय योजले पण सर्व व्यर्थ गेले. शेवटीं प्रभा, काय केलं कल्पना आहे कां तुला ? " त्याच्या डोळ्यांत आसवं आलीं. तो रडूं लागला. " प्रभा, सरलेच्या पायांवर मी एके दिवशीं मस्तक ठेवलं अन् म्हटलं, ' सरल, तुझा गुलाम म्हणून तरी या अभागी प्राण्याला आपल्या पदरांत घे.' अन् त्यावर ती काय म्हणाली, शशी समजलं कां ? ' ऊठ, मला जरी तूं प्रणयाच्या भूमिकेंत आवडत नसलास, माझं जरी तुझ्यावर प्रेम नसलं तरी मी तुझ्याशीं एकनिष्ठपणानं राहीन ' आणि तिनं माझ्या मस्तकाचं चुंबन घेतलं.

प्रभा, मला समजत नाहीं मी कोणत्या स्थितींत आहे. तुला समजत असेल तर तुझ्यासारखा सुखी प्राणी तूंच ! आणि त्याबद्दल मी तुझं अभिनंदन करतों.—" आणि खरोखरच शशीनं माझी पाठ थोपटून माझं अभिनंदन केलं. त्याचवेळीं मघाशीं आनंदानें बागडत, खेळत असलेलं तें मूल रडूं लागलं. मला क्षणभरच कससंच झालं.

रात्रीच आम्ही मुंबईहून घरीं परतलों. दिवाणखान्यांत सरला आमची वाट पहात होती. मला पहातांच ती म्हणाली, " काय प्रभा? कशी काय झाली मुंबईची ट्रिप? मजा केली असेल नाहीं? माझी आठवण तरी झाली कां?" तिनं लडिवाळपणानें आपल्या मानेस एक गोडसा गिरका दिला. शशी आपल्या खोलींत कपडे उतरण्याकरितां गेला होता.

" सरला, तुमची आठवण कां बरं होणार नाहीं? पण सारखा मंत्रजप मात्र चालवला नव्हता हं!" मी तिची थट्टा करण्यासाठीं म्हटलं. मी सरलकडे पाहिलें. किती सुंदर होती ती!

" हं हं, प्रभा, सांगेन बरं कधीं तरी!" आणि तिनें आपले गाल फुगवून लटक्या रुसव्यानें अन् स्निग्ध नजरेनें माझ्याकडें पाहिलें. फार गंमत वाटली मला तिच्या तशा पहाण्याची.

मी मनांत विचार केला, " कां बरं अशी सरला व्हावी? पण मग तिनं लग्नतरी कां केलं त्याच्याबरोबर! शशीशीं गप्पा विनोद न करतां ती माझ्याशीं एवढ्या मोकळेपणानें वागते, बोलते अन् हंसतेसुद्धां? काय बरं याचा अर्थ? असा असेल कां?"—आणि तशा प्रकारचा विचार मनांत येऊन माझ्या हृदयास फार वेदना होत. मानवी–जीवनांत किती तरी दुःखाचे प्रसंग येत असतात—नव्हे मानवी–जीवन हें एक प्रकारचं दुःखच आहे. पण स्त्रीच्या आयुष्यांत अशा प्रकारचं दुःख येणं अन् तेंसुद्धां अनादिकालापर्यंत! किती मरणप्राय दुःख तें! आणि सरल-सारख्या निष्पाप, शान्त अन् निरपराधी मुलीवर!

या प्रसंगानंतर आठच दिवसांनीं शशीकांत कुठल्याशा कामासाठीं बाहेर गांवीं जायचा होता. मला त्यानं मुद्दाम जेवणाचं आमंत्रण केलं होतं. मी संध्याकाळींच शशीच्या घरीं गेलों.

मी, शशी अन् सरलनें गप्पागोष्टी थट्टाविनोद करीत आनंदानें जेवण केलं. पहांटेस शशीस लवकर उठावयाचे असल्यामुळें तो जेवण झाल्या-बरोबर झोंपी गेला. सरलाहि आपल्या खोलींत जाऊन झोंपली. मी बाहेरच्या दिवाणखान्यांत माझ्या कॉटवर पडलों होतों. मला झोंप

मुळींच येईना; डोक्यांत नानाप्रकारचे विचार येऊं लागले. साहजिकच माझं लक्ष खिडकीबाहेर गेलें. पौर्णिमेचा चंद्र निरभ्र अस्मानांत आनंदानें विहार करीत होता. चटकन् माझे विचार सरलच्या आयुःपथाकडे वळले. चंद्राची घनदाट अमावास्या संपून आज पौर्णिमा उगवली होती! सरलची अद्यापी अमावास्याच होती. उत्तर व दक्षिण ध्रुवांकडे सहा महिन्यांचा दिवस व सहा महिन्यांची रात्र चालू असते असें भूगोलज्ञ म्हणतात. तसंच नाहीं कां हें! पौर्णिमेचा सुखकर चंद्र तिनें पाहिला नव्हता. मला वाईट वाटलें. पण कां कुणास ठाऊक मला त्या चंद्राकडे पाहून त्या दुःखांतहि हंसू आलें.

"झोंपला नाहीं?" मागून शब्द आले म्हणून पाहूं लागलों तों आंतल्या खोलीचा दरवाजा उघडून सरला माझ्याकडे येत होती.

"तुम्ही नाहीं झोंपला?"

"मला आज झोंपच कशी ती येत नाहीं. पुष्कळ प्रयत्न केला. आपण बाहेर अंगणांत बोलत बसूं!"

शशीकांत आंतल्या खोलींत एकटाच झोंपलेला असतांना त्याच्या पत्नीबरोबर मी रात्रीच्या वेळीं त्याच्या नकळत गप्पागोष्टी करणें मला बरं वाटलं नाहीं. पण सरलचा शब्द मला मोडवेना. मी बिछान्यावरून उठलों अन् अंगणांतील अगदीं वरच्याच पहिल्या पायरीवर बसलों.

"बोला कीं!" सरला माझ्या शेजारींच बसून, मान किंचित् कलती करून, मी स्तब्ध बसलेला पाहून म्हणाली.

"तूंच बोल! तूंच मला गप्पागोष्टी करण्यास बोलवलंस ना? मग?" माझ्या तोंडांतून चटकन् एकेरी नांव बाहेर पडलं.

कांहीं काळ स्तब्धतेंत गेला. आम्ही दोघं स्वस्थ होतों. सरला माझ्याकडे सारखी नजर लावून बसली होती.

"प्रभा" सरलनं माझा हात आपल्या हातांत घेतला आणि तळहातावर नखांनीं रेघोट्या काढण्यास सुरवात केली.

"काय सरल?" मी विचारलं.

"प्रभा, तुम्ही किती चांगले आहां!" असें म्हणून तिनें माझे दोन्ही

हात आपल्या हातांत घेतले अन् त्यावर ती आपल्या नाजुक हातांचा हळू-वार स्पर्श करूं लागली.

" सरल, तुझ्या जीवनांत आनंद उत्पन्न करणं सर्वस्वीं तुझ्याच हातीं आहे. आत्मविश्वास आणि समाधानी–वृत्ति हीच खरी खरी आनंदी-जीवनाची कल्पना आहे. सरल, शशीला काय बरं वाटत असेल अशा या तुझ्या वागण्यानं ? "

" प्रभा, चेहऱ्यावरील आनंदी भाव अन्तःकरणांतील तळमळ शान्त करीत नाहीं. हृदयाचा डाव हृदयांतच ओळखावा लागतो. "

कितीतरी वेळ तिच्याशीं गप्पा मारीत होतों. माझ्याशीं ओळख झाल्या-पासून आजच मी सरलला पहिल्यानेंच एवढ्या आनंदांत पाहिली असेल. किती मनमोकळेपणानं बोलत होती ती माझ्याशीं !

मनमोकळेपणानं गोष्टी करण्यास अन्तःकरणाच्या जिव्हाळ्याची जरूरी असते. प्रेमळ माता आपल्या बाळाशीं अशाच जिव्हाळ्यानें बोलत असते. त्याच जिव्हाळ्यानें सरला माझ्याशीं बोलत होती कां ? कीं...

घड्याळांत चाराचा ठोका पडला. मला माहित होतं कीं शशीची उठ-ण्याची वेळ आतां झाली आहे; म्हणून मी लगेच तसं सरलला म्हटलंसुद्धां.

" सरल, शशी उठण्याची आतां वेळ झाली. जा आपल्या खोलींत जाऊन झोंप. "

" पण सकाळीं मी लवकरच तुम्हांस उठवावयास येईन हं ? " तिनं पाठ फिरविली व आपल्या खोलीकडे मोर्चा वळविला पण एकदां तरी मागं वळून माझ्याकडे पाहिल्याशिवाय तिच्यानं रहावेना.

थोड्याच वेळांत शशी उठला. त्यानं तोंड वगैरे धुतलं. स्वतःच स्टोव्ह पेटवून आम्हां दोघांसाठीं चहा केला. मला उठवलं, सरलला जागं केलं आणि स्वतःचा चहा घेऊन कपडे केले. माझ्याजवळ आला व म्हणाला, " प्रभा, चार दिवसांसाठीं कांहीं कामाकरितां मी बाहेरगांवीं जात आहे, तोंपर्यंत माझ्या सरलला संभाळ " आणि चटकन् त्यानें जवळच बसलेल्या सरलच्या मस्तकाचें चुंबन घेतलें आणि " सरल येतो मी ! " एवढंच म्हणून तो निघाला.

मी मंत्रमूढ झालों त्याच्या तशा प्रकारच्या वागण्यानं. मी सरलकडे पाहिलें. तिच्या दोन्ही गालावरून अश्रूंचे ओघळ सरसर खालीं वहात होते. सर्वत्र स्तब्धता पसरली होती.

" सरल!" मी तिला हांक मारली व त्या शांततेचा भंग केला.

" प्रभा!" तिनं चटकन् उठून माझ्या गळ्याभोंवतीं विळखा घातला आणि मीहि प्रेमभरानें तिला माझ्या बहुपाशात घेतलं.

तिनं डोळे पुसले, माझ्या चेहऱ्याकडे नजर लावली अन् कां कुणास ठाऊक ती हांसली.

मीहि हांसलों. आणि नकळतच माझे ओंठ तिच्या नाजुक ओंठाशीं मिलीन झाले.

इतक्यांत दरवाजा उघडला गेला, मी चमकून पाहिलें. अद्यापहि सरला माझ्या बाहुपाशात होती. शशीच आंत येत होता.

" माफ कर हं प्रभा! पण माझं मी पैशाचं पाकीट विसरलों तें न्यायला आलों!" त्यानें चटकन टेबलाचा खण उघडला, पैशांचं पाकीट खिशांत टाकलं अन् बाहेर चालता झाला. किंचितहि त्यानें वळून पाहिलें नाहीं. पण घराचा उंबरठा ओलांडतांना त्याच्या पायाला किंचित् ठेंच लागल्यामुळें त्याच्या तोंडांतून वेदनादर्शक निघालेला 'स्' आवाज मला ऐकूं आला अन् डोळ्यांतून टपकन् खालीं जमिनीवर गळालेले दोन अश्रू माझ्या दृष्टीपथांतून निसटले नाहींत.

त्यानंतर शशी पुनश्च माझ्या दृष्टीस पडलेला नाहीं.

[ सुप्रसिद्ध रशियन लेखक Tchehov यांच्या Terror या गोष्टीवरून ]

---

चित्रा—१८ डिसेंबर १९३८.

## ३ : :     अंतरीचे निनाद

कॉलेज सुटल्यानंतर मी शोभनेच्या घरीं गेलों कीं फार आनंद व्हायचा तिला. नेहमीं ती माझी वाट पहात असायची. रस्त्यांतून मला येतांना पाहून ती हांसे आणि मानेला किंचित् गोडसा वळसा देऊन दार उघडण्यासाठीं मागें फिरे. तेवढ्यांत मी दोन मजले चढून, बेल वाजवून दारासमोर उभा राही. शोभना दार उघडीत हांसत विचारी, " कां, आज उशीरसा ? "

उशीर झाला नसतांसुद्धां शोभना नेहमींच मला हा प्रश्न करी आणि तो दररोजचा प्रश्न असल्यामुळें त्याला माझहि उत्तर ठरलेलें असे.

" हो, झाला खरा ! " मी हांसत म्हणे.

" खरंच ! " असें म्हणून ती आपली मान किंचित् माझ्याकडे वळवी अन् हांसे.

आणि मी आंत शिरून इझिचेअरवर बसलों व तिच्याकडे पाहिलें कीं ती मला विचारी, " चहा घेतां का ? "

तिच्या घरीं संध्याकाळचा चहा घेण्याचा माझा नित्यक्रम असल्यामुळें ती लागलींच चहा सांगण्यास आंत निघून जाई.

आमचा दोघांचाहि चहा झाल्यानंतर शोभना बाहेर फिरायला जाण्या-

साठीं कपडे करण्याच्या तयारीस लागे आणि मी बाहेरच्याच दिवाणखान्यांत बसून तिच्याशीं गप्पागोष्टी करी.

शोभना खरोखरच नांवाप्रमाणें माझी शोभा होती. तिच्या चेहऱ्याकडे कुणीहि पाहिलें तरी त्यावर खुलून स्पष्टपणें दिसणारा मृदुभाव तिच्याविषयीं आपुलकीची भावना उत्पन्न करी. पाठीवरून कधीं कधीं रुळत असलेली लांबलचक वेणी साहजिकपणें मानेला दिलेल्या गोडशा वळशानें नागिणीप्रमाणें डौलदार हाले आणि तें पहातांच हिच्याहि नाजुक हृदयांत भावनेच्या नाजुक लहरी हालत असतील, असा क्षणभर भास होई आणि चेहऱ्यावर वाऱ्यानें भुरभुरणारे केंस तिच्याकडे पहातांच माझ्याहि मनांत मृदु भावना उत्पन्न करीत.

कित्ती गोड होती माझी शोभना! गौरकान्तीला शोभणारें आकाशी रंगाचें पातळ नेसून ती माझ्याबरोबर फिरायला निघाली कीं रस्त्यावरून जाणारे येणारे सारे लोक आम्हां दोघांकडे निरखून पहात. किती सुंदर होती शोभा! अभिमान वाटे मला तिच्या सौंदर्याचा.

तिचा तो किंचित् लांबट चेहरा, अरुंद जिवणी, काळे पाणीदार डोळे, किंचित् बांकदार नासिका, उन्नत वक्षःस्थळ आणि एकंदर शरीराला शोभेलसा सुदृढ बांधा! सारे गुण तिच्या स्वाभाविक सौंदर्याची साक्ष देत होते. चालतांनासुद्धां किती डौलदार पावलें टाकी ती!

वेषभूषा करण्यांत शोभना फारच कुशल होती. फिरायला जातेवेळीं कपडे करण्यास तिला कमींतकमी तास दीडतास तरी लागे. केस विंचरणें, तोंड धुणें, स्नो-पावडर लावणें, कपडे बदलणें वगैरे सारे व्यवहार ठरलेले. पोशाखांत किती नीटनेटकेपणा! दरदिवशीं निराळी साडी. साडीच्या रंगाला शोभेसाच ब्लाऊझचा रंग आणि त्या दोघांनाहि शोभेल अशी वेणीच्या टोंकाला बांधलेली रिबन्. प्रत्येक बाबतींत शोभना सौंदर्यदृष्टीनें पाही. तिच्या साऱ्या अवयवांत, पेहरावांत, बोलण्याचालण्यांत सौंदर्याचा एकसूत्रीपणा पूर्णपणें प्रतिबिंबीत झालेला दिसत होता.

आणि सर्वांपेक्षां तिचा स्वभाव किती खेळकर अन् आनंदी! सौख्याची, हास्याची चालती बोलती प्रतिमा होती ती! कुणीहि तिच्याशीं बोलो

त्याला तिच्याशीं बोलण्यांत एकप्रकारचा आनंद वाटल्याशिवाय रहाणार नाहीं. दुःखांत, काळजींत गांजलेला, गरिबीच्या संसाराला कंटाळलेला मनुष्य तिच्याशीं बोलूं द्या, त्याला तिचा सहवास असलेल्या क्षणापुरता का होईना, पण साऱ्या गोष्टींचा विसर पडेल.

त्या दिवशींची गोष्ट. मी बाहेरच्या दिवाणखान्यांत बसून आंतील खोलींत कपडे करीत असलेल्या शोभनेशीं गोष्टी करीत होतों. मी सहजच म्हटलं, " शोभा, बायकांचं हें असं असतं बघ ! "

" काय असतं हो असं हें बायकांचं ? " तिनें ताबडतोब आंतून प्रश्न केला.

" म्हणजे असं कीं माणसाच्या ठिकाणीं नीटनेटकेपणा असावा, पण तो मर्यादित असावा. "

" बायकांचा नीटनेटकेपणा मर्यादेबाहेर असतो असं तुमचं मत आहे कीं काय ? "

" अर्थातच ! "

" कशावरून म्हणतां तुम्ही हें ? " तिनें विचारलं.

" तुझंच पहा ना ! अद्याप तुझी तयारी झालेली दिसत नाहीं. होय ना ? "

माझ्या तोंडांतून शब्द निघण्याचाच अवकाश, शोभना ताबडतोब बाहेर आली अन् म्हणाली, " हें पहा, झाली माझी तयारी. चला ! पण त्यापूर्वी तुम्ही माझ्या बाबतींत तरी मघांचे शब्द मागें घेतलेच पाहिजेत." आणि तिनें माझे हात धरून मला उठवलें.

" शोभा, साऱ्या स्त्रियांत तूं एक निराळीच व्यक्ती आहेस ! खरं ना हें शोभा ? " आणि मी किंचित् तिरप्या नजरेनें शोभेनेकडे पाहिलें.

आणि खरोखरच शोभना साऱ्या स्त्रियांपेक्षां निराळी होती. तिचीं सौंदर्याविषयींचीं मतें, तिचं बोलणं, चालणं, वागणं, सारं कांहीं निराळंच होतं.

त्या दिवशीं ती फारच सुंदर दिसत होती. वेषभूषेसाठीं तिनें खर्च केलेल्या वेळेचा योग्य परिणाम तिच्या सौंदर्यवृद्धींत झाला होता. आज

तिनें केसाचा शेपटा न घालता मानेवरून डौलानें रूळणारा आंबाडा बांधला होता. अंबाड्यांत गुलाबाचं एकच टपोरं फूल उजव्या बाजूस खोवलेलें होतें. गळ्यांत घातलेली शुभ्र टपोऱ्या मोत्यांची माळ वक्षः-स्थलावरून हालतांना मधून मधून चमकत होती. जॉर्जेटचें निळसर रंगाचें विनाकच्छ पातळ आणि अस्मानी रंगाचा ब्लाउझ तिच्या सौंद-र्यांत भर घालीत होतें. डाव्या हातावर रिस्टवॉच बांधल्यामुळें, उजव्या हातास चारपांच बांगड्यांचा सहवास लाभला होता. आणि या सर्वांवर तिच्या दोन्ही गालांना त्या हांसतेवेळीं पडणाऱ्या खळ्या व हनुवटीवर स्पष्टपणें दिसणारा तीळ संपूर्ण सौंदर्यवर्धन करीत होता.

माझ्या साऱ्या इच्छा ती पूर्ण करी. हेतू हाच कीं त्यामुळें मला आनंद व्हावा, मी सुखी व्हावें!

"आज अमक्या ठिकाणीं फिरायला जाऊं?" असें मी म्हटलें कीं ताबडतोब ती हांसून उत्तर देई, "हां! चला जाऊं या तिकडे," आणि माझ्याकडे ती अनिमिष नेत्रानें पाही.

"आज रात्रौ सिनेमाला जाऊं या?" असं मी विचारलें कीं ती म्हणे, "खरंच! आज किती दिवसांत सिनेमाला गेलों नाहीं आपण!"

आणि मी एकाद्या दिवशीं तिला चिडविण्यासाठीं मुद्दाम म्हटलं कीं, "शोभा, आज मला फारच कंटाळा आला आहे! मारूं या इथंच गप्पागोष्टी!"

मला वाटे, शोभा हिरमुसलं तोंड करील. रागानं हातपाय झटकील, मानेला किंचित् लटक्या रागाचा झटका देईल, मान किंचित् वांकडी करून खुर्चीवर झटकन् बसेल अन् चिडक्या स्वरांत म्हणेल, "पुरे हो तुमचं! केव्हां म्हणून फिरायला जायला नको तुम्हांला!" आणि तशा त्या चिडलेल्या स्थितींत शोभाला पहाण्यास मला मोठीच गंमत वाटेल. पण तसें कांहींहि न होता ती मोठ्या आनंदानें खुर्चीवर बसे, आपल्या दोन्ही हातांचीं बोटें दुमडून त्यावर हनुवटी टेकी व दोन्ही गुढघ्यावर हाताचे कोपरे टेकून म्हणे, "कां? आज कंटाळासा आला! डोकंबिकं दुखतं कीं काय?"

त्यावर मी लागलींच म्हणत असे, "शोभा, तुझ्या प्रेमळ सहवासांत मलाच काय पण जीविताला कंटाळलेल्या एकाद्या अभागी प्राण्यालासुद्धां आनंद वाटेल! मग दुखत असलेलें डोकं थांबण्याची गोष्ट बोलूच नये!"

आणि असं मी म्हणतांच ती आपल्या मानेला चटकन् एक सुंदरसा वळसा देई अन् म्हणे, "काय पण! तुम्ही एकाद्याची स्तुती करूं लागला कीं त्याचं तुम्हांला भानच रहात नाहीं."

"खरं आहे तुझं म्हणणं शोभा!" मी तावडतोब तिच्या म्हणण्याला उत्तर देई, "कारण सुंदर स्त्रियांच्या सहवासांत मनुष्याचं भान हरपतं असें म्हणतात."

"इश्श! पुरे झाली तुमची थट्टा! नाहींतर मी बोलणारच नाहीं तुमच्याशीं." असें म्हणून ती लटक्या रागानें आपले गाल फुगवी अन् मान एकीकडे फिरवून बसे. किती आनंद वाटे मला तिच्या अशा रागावण्याचा! आणि ती रागावण्यानें मला आनंद होतो हेंहि तिला पूर्ण-पणें माहीत होतें. मला आनंद देण्यासाठींच शोभना नेहमीं तत्पर असा-यची. मी 'असं कर शोभा' असं म्हटलं कीं ती तसं करायची. मला अमक्या रंगाचीं पातळं आवडतात म्हणून तसल्या रंगाचीं पातळें ती नेसे. पाठीवरून सोडलेल्या वेणीपेक्षां मानेवरून रुळणारा सैलसा अंबाडा मला आवडतो हें तिला माहीत असल्यामुळें ती नेहमीं केसाचा अंबाडाच घालीत असे. पातळांची अन् ब्लाऊझची पसंती माझ्यावरच अवलंबून असायची. कानांतील रिंग्ज माझ्या पसंतीप्रमाणें ती घाली. हातांतील बांगड्या मला आवडतात तशा प्रकारच्या ती वापरी. सारांश, सारं कांहीं मला आनंद देण्यासाठीं, सुखी करण्यासाठीं माझी शोभा करित असे. माझ्या आनंदांत ती आपलं समाधान मानी. जीवनाचें सौख्य ती माझ्या खेळकर आणि आनंदी मुद्रेंत पहात असे.

त्या दिवशीं सेकंड एल्.एल्. बी. परिक्षेचा निकाल लागला आणि मी त्यांत यशस्वीरितीनें सेकंड-क्लासांत पास झालों ही बातमी ऐकून शोभ-नेला फारच आनंद झाला. तिच्या घरीं जातांच तिनें माझं हार्दिक

अभिनंदन केलें आणि मी द्यायच्या अगोदर आपणहून मला पेढे दिले.

" शोभा, खरं पाहिलं असतां मी तुला पेढे द्यावयाचे! त्या ऐवजीं तूंच मला दिलेस! माझी शोभा!"

" तुम्हाला एकट्यानांच नाहीं दिले. तुम्ही पास झालां म्हणून इतरानांहि वाटले. अशोक, उद्यां रविवार आहे! सर्व मित्रमंडळींना चहा-पार्टीला बोलवावयाचें आहे."

" हें सारं कशासाठीं शोभा?" मी विचारलें.

" तुमच्यासाठीं अशोक! माझे अशोक वकीलीची परिक्षा पास झाले त्या आनंदाप्रित्यर्थ मी पेढे वाटूं नये का? माझे अशोक पास झाले, हा केवढा अभिमान मला वाटतो अशोक! ही तुमची शोभा, तुम्हांस सुख देण्यासाठीं वाटेल तें करील!" असें म्हणून तिनें खुर्चीवर असलेला माझा हात आपल्या हातांत घेऊन त्याच्याशीं चाळा करूं लागे.

प्रेमाची परमोच्च स्थिति मी त्या दिवशीं मिळविली. साऱ्या मित्र-मंडळीसमवेत आणि नातलगांसमक्ष त्या दिवसापासून शोभा 'माझी' झाली. संसाराचा रथ चालविण्यास मला त्या दिवसापासून शोभनेची मदत मिळूं लागली. अननुभूत आनंद झाला मला अन् शोभनेला त्या दिवशीं. किती आनंदांत दिवस गेला तो!

त्यानंतर दोनच महिन्यांची गोष्ट. मी कोर्टांमधून संध्याकाळीं परत आलों होतों. कपडे वगैरे काढून इझिचेअरवर बसलों. मला वाटलें शोभना आतां चहा घेऊन येईल. दहा मिनिटें वाट पाहिली, आली नाहीं. काय करते पहावं म्हणून सहजच आंत गेलों. शोभा आंतील पलंगावर पडलेली. मी तिच्याजवळ गेलों अन् हासत म्हटलं, " शोभा, आज चहा नाहीं द्यायचा मला?"

" करते हं!" असं म्हणून ती उठली आणि चहा करूं लागली. मला किंचित् आश्चर्य वाटलं अन् त्याचवेळीं वाईटहि वाटलें.

दोघांनीं एकाच टेबलाजवळ बसून चहा घेतांना आम्हीं एकमेकांनीं कितीतरी गप्पागोष्टी केल्या, पण त्यांत शोभेचा पूर्वीचा मनमोकळेपणा दिसून आला नाहीं.

" शोभा, आज 'कॅपिटल'ला फार सुंदर पिक्चर आहे. चल जाऊं या! येतेस?" मी चहा घेतल्यावर विचारलें.

" आज नको! आज मला फार कंटाळा आला आहे!" तिनें कंटाळून उत्तर दिलें.

" मग 'शो' पाहिल्यावर जरा करमणूक होईल. तुला मग अंमळ बरं वाटेल."

" नको! मला नाहीं आवडत इंग्लिश पिक्चर!" शोभा किंचित् त्रासिक चेहऱ्यानें म्हणाली.

मला फार वाईट वाटलें. कांहीं दिवसापूर्वी मी सिनेमाला जाण्याची नुसती इच्छा दर्शवितांच आनंदानें, खेळाडूवृत्तीनें व हंसऱ्या चेहऱ्यानें "चला जाऊं या!" असं म्हणून उड्या मारित कपडे करण्यासाठीं आंत जाणारी शोभना ती हीच कां? मला संशय वाटूं लागला. माझी इच्छा पूर्ण करून मला आनंद देणारी पूर्वीची शोभा हीच कां! मी विचारांत पडलों. तरीपण तिच्या इच्छेविरुद्ध वागून तिला दुःख होऊं नये म्हणून मी 'शो' ला जाण्याचा बेत रद्द करून फिरायला जाण्याचें ठरविलें.

" बरं फिरायला तरी बाहेर जाऊं! घरीं बसून मला फार कंटाळा येतो." मी म्हटलं.

आपण नाहीं म्हटल्यास मला राग येईल असं तिला वाटत असावं. कारण तिनं थोडा वेळ आपल्या मनाशीं विचार केला अन् म्हटलं, " चला जाऊं या!"

मी तोंड वगैरे धुतलें व फिरायला जाण्यासाठीं कपडे अंगांत घातले. शोभा कपडे बदलण्यासाठीं आंत गेलीच होती.

थोड्याच वेळांत ती बाहेर आली. तिच्याकडे पहातांच मला आश्चर्याचा धक्काच बसला. घरीं वापरलेलें पातळच तिच्या अंगावर होतें. कपडे मुळींच बदललेले नव्हते. तोंड स्वच्छ धुतलेंहि नव्हतें. स्नो–पावडर बाजूलाच. केंसाच्या बटा चेहऱ्यावरून फिरकतच होत्या.

सौंदर्यवर्धनाच्या बाबतींत साऱ्या स्त्रियांना मागं सारून नीटनेटका पोषाख कसा करावा, सुंदर दिसण्यासाठीं कुठल्या वस्तूंचा कशा रीतीनें

उपयोग करावा याचें जणूं काय इतर स्त्रियांना धडे देणारी माझी शोभा आज अशी कशी झाली? माझ्या मनांत विचार आले. माझ्या नजरेस जास्त सुंदर दिसावं म्हणून स्नो-पावडर लावणारी, सुंदर तलम जॉर्जेटचें अगर रेशमी पातळ नेहमीं नेसणारी, मला आवडतात म्हणून क्षुल्लक वाऱ्याच्या स्पर्शानें आंदोलन घेणारीं सोनेरी इअर-रिंग्ज वापरणारी आणि माझ्या मुखावाटे नेहमीं प्रशंसेचा प्रत्येक शब्द ऐकण्यास आतुर असलेली माझी शोभा आज मला निराळीच वाटली.

"हें काय? आज कपडे वगैरे बदलावयाचे नाहींत? अशीच फिरायला येणार का तूं?" मी बोलून गेलों.

"नको आतां बदलायला. चालेल हें पातळ! तसं कांहीं विशेष खराब नाहीं." तिनें उत्तर दिलें.

किती फरक झाला होता शोभनेच्या वागणूकींत! वरील प्रसंगानंतर कितीतरी प्रसंग येऊन गेले. कितीतरी गोष्टी घडल्या पण त्यांतील प्रत्येक प्रसंगांत, हरएक गोष्टींत शोभनेची पूर्वींची अतुरता, खेळाडुवृत्ती, बालिश-पणा व आनंदीस्वभाव पार नाहींसा झालेला दिसत होता.

साहजिकच माझ्याहि मनावर या गोष्टीचा परिणाम झाला. माझीहि घरची ओढ हळुहळु कमी होऊं लागली. कोर्टामधून सुटल्यावर मीहि पूर्वींप्रमाणें तडक घरीं न येतां मित्रमंडळीच्या बैठकींत वेळ घालवूं लागलों. हळुहळुं घरीं येण्यास मला उशीर होऊं लागला. सकाळींसुद्धां नऊ वाजतांच जेवण वगैरे उरकून मी कोर्टांत जात असें. माझ्या घरांत पूर्वीं मिळत असलेलें सौख्य मला मिळेनासें झालें.

नानाप्रकार केले, निरनिराळ्या युक्त्या योजिल्या. मी स्वतः कितीवेळां शोभनेला समजावून सांगितलं, कितीएक जणांकडून मध्यस्थी केली गेली. पण व्यर्थ. पूर्वींची शोभा मला मिळेना. मी जीवाला फारच कंटाळलों. पूर्वींचे शोभनेबरोबरचे प्रेमाचे संवाद मला मिळेनात. फिरायला जावं म्हटलं तर शोभना बरोबर येईना. बरं, घरीं बसून गप्पागोष्टी कराव्या तर त्यासही मन धजेना. सारा जीव त्रासून गेला.

तो दिवस मला पक्का आठवतो. त्या दिवशीं मी संध्याकाळीं घरीं आलों. जेवण होतं तें जेवलों. आणि वर्तमानपत्र वाचीत कॉटवर लवंडलों. मला चांगलीच झोंप लागली असावी. माझ्या शेजारीच शोभना झोंपलेली होती.

मध्यरात्रीनंतर मी जागा झालों. शोभना शान्तपणें पलंगावर झोंपली होती. मी तिच्याकडे पाहिलें मनांत एकच विचार आला. मी चटकन् तिला मिठी मारली आणि तिच्या मस्तकाचें चुंबन घेतलें. मला रडूं कोसळलें. मी ओक्साबोक्सीं रडूं लागलों.

शोभा धडपडून जागीं झाली. तिला मला रडतांना पाहून आश्चर्य अन् भयहि वाटलें. तिनेंहि घाबरून मला मिठी मारली.

" तुम्ही रडतां अशोक ? कां ? "

" मी रडतों ? शोभा, मी कां रडतों तें माझं मलाच कळत नाहीं. "

" अशोक ! " तिनेंहि रडण्यास सुरवात केली, " अशोक, चूक झाली माझी ! "

" शोभा ! माझी शोभा ! मला पूर्वीची शोभा मिळेल का ? " मी शंकित अंत:करणानें विचारलें.

" अशोक ! " तिनें आर्तस्वरानें हांक मारली आणि डबडबलेल्या नयनांनीं माझ्याकडे पाहिलें.

" शोभा ! " मी हांकेला ओ दिली.

आणि त्या हांकेंत व प्रत्युत्तरांत माझे अन् शोभेचे सारे विचार विलीन झाले.

पहांटेस मी अन् शोभा मोठ्या आनंदानें उल्हसित अंतःकरणांनीं जागे झालों.

" चला, आपण आज फिरायला जाऊं ? " मोठ्या आतुरतेनें तिनें प्रश्न केला.

" चल ! येतेस ? " मी आश्चर्यानें म्हटलें. तिनें माझ्याकडे पाहिलें. तिच्या नजरेंत पश्चात्तापाची झळ मला पूर्णपणें दिसली.

तिनें केंस साफ केले, तोंड धुतलें, कपडे बदलले, आणि माझ्या

जवळ येऊन, माझा हात हातांत धरून किंचित् मान वर करून मला म्हणाली, " चला ! "

किती सुंदर दिसत होती माझी शोभा त्यावेळीं ? मला तिच्या वागणुकींत पडलेल्या आकस्मिक फरकाचें आश्चर्य वाटलें. पण कारण समजेना—मनांत शंका आली, " अंतरिचे निनाद तिच्या हृदयावर आपटले असतील का ! "

आणि बाहेर पडतांना दरवाज्याजवळ मी शोभनेला माझ्या बाहुपाशांत घेतले अन् म्हटलं, " किती चांगली आहे माझी शोभा ! "

तिनें माझ्याकडे पाहिलें—अन् हांसली मीहि तिच्याकडे पाहिलें अन् हांसलों. आणि त्या हास्यांतच आमचीं पाऊलें बाहेर पडलीं. नव्या जीवनाचा प्रारंभ होता तो !—

---

आशा—१३ ऑगष्ट १९३९.

## ४ : : प्रतिस्पर्धि

माझ्या शेजारींच रहात असलेली नीला पत्त्याचा फारच शोकीन्! मी संध्याकाळीं ऑफिसमधून आलों कीं तिनं माझ्या खोलींत इझिचेअर-वर पडावं, आणि हाताचीं दोन्हीं कोंपरं आपल्याच मांडीवर टेकावीं, बोटांची दुमट नाजुक गालांवर टेवावी आणि किंचित् कलती मान ठेवून विचारावं, 'अविमामा, आतां खेळू या ना पत्त्यांनीं?'

आणि मी नकारार्थी मान हालवतांच तिनं चटकन् खुर्चीवरून उठून माझे हात पकडावेत अन् हिरमुसल्या चेहऱ्यानं म्हणावं, 'असं हो काय करतां अविमामा? चला ना!'

तिला नाखुष झालेली पहाणं फार जीवावर येई माझ्या! खरोखर बालकांची रम्य चित्रें प्रौढ माणसांच्या हृदयांत खोलपर्यंत जाऊन रुततात असं मी ऐकलं होतं. मला तिला ना म्हणवत नसे आणि ऑफिसमधून काम करून कंटाळा आला असतांनासुद्धां मी तिच्याबरोबर पत्ते खेळण्यास बसें.

नीला माझ्या आनंदाचा विसावा होती. सर्व दिवसभर ऑफिस-मधील कंटाळवाणं काम करून, दमूनभागून घरीं आलेल्या मला नीला आपल्या सदा हांसऱ्या चेहऱ्यानं सौख्याचे क्षण देत असे.

" नीलू, एकादं गाणं म्हण पाहूं ! " असं मी म्हणतांच तिच्या कोमल कंठांतून निघणारे संगिताचे मधूर स्वर मला जगाचा विसर पाडीत आणि मी कॉटवर लवंडलों असता माझ्या अंगाशीं बिलगून प्रेमळपणानं माझ्याशीं गप्पागोष्टी करतांना माझ्या मनास भास होई, " जग हें असंच सुखी होईल का ? "

तिच्या नजरेंतील सौम्यता, चेहऱ्यावरील प्रेमळ हावभाव, हाताचे अन् बोटाचे माझ्याशीं चाललेले लडिवाळ बालिश चाळे, गोड हास्य, आणि मधूर वाणी या सर्वांचा एकसूत्रीपणा करून माझ्या आयुष्यांत मला रात्रंदिन सौख्य देणारा तो एक आनंदाचा ठेवा होता.

रात्रीचं जेवण झाल्यावरसुद्धां ती माझ्याकडे येई अन् म्हणे, " अविमामा, आतां सांगतां ना एखादी गोष्ट ! " आणि माझ्या मांडीवर ती आपलं डोकं ठेवी. तिच्या नाजुक कपोलभागावर भुरभुरणारे तिचे काळे केस मागे सारतांना मला फार आनंद होई आणि मी त्या आनंदांत तिला गोष्ट सांगत असतांना त्या सुखांतच ती झोंपी जात असे.

सुखाचे क्षण फार वेळ टिकत नसतात. पण त्याची स्मृती मात्र चिरकाल टिकणारी नसली तरी बहुतकाल मनःपटलावर तरंगत असते.

त्या दिवशींसुद्धां तसंच झालं. तो रविवार होता. आठवड्यांतून मिळणारा एखादाच रविवार म्हणजे ऑफिसमधील लोकांना किती समाधानाचा जात असेल ! त्या दिवशीं नेहमींपेक्षां उशिरा होणारं सुग्रास जेवण मी जेवलों व वामकुक्षी करीत सहजच मी कॉटवर लवंडलों. जडान्नानें आलेला मंदपणा मला किती झटपट निद्रावश करीत होता.

इतक्यांत पायाच्या तळव्यास गुदगुल्या झाल्या अन् तात्रडतोब माझ्या गालासहि नाजुक स्पर्श झाला. मी चमकून उठलों अन् पहातों तों समोर हांसरी छोटी नीला उभी. त्या ठिकाणीं त्याक्षणीं दुसरा कुणी असता तर माझा निद्राभंग केल्याबद्दल मी त्याला एक थप्पड दिली असती. एवढा मला राग आला होता. पण नीला, माझी आवडती नाजुक छोटी नीला हंसतमुखानें उभी असलेली पाहून माझा राग अर्थात्च नाहींसा झाला. मी बिछान्यावर बसलों.

' अविमामा, जायचं ना सिनेमाला ? काल सांगितलं आहे तुम्हीं मला ! ' आणि तिनं माझे हात ओढण्यास सुरवात केली.

लहानपणच्या खेळकरवृत्तीचं किती हें हुबेहूब चित्र ! बालपणच्या लीला तारुण्यांतील दुःखालाहि विस्मृति पाडतात. मग मी तर अद्याप-पावेतों सुखांतच होतों आणि छोट्या नीलेच्या सहवासांत तो आनंद दिवसेंदिवस वाढतच होता.

' चल, जाऊं या ! ' असें म्हणून मी उठलों, तोंड वगैरे धुतलं चहा घेतला आणि कपडे करून नीलेला सिनेमाला घेऊन गेलों. नीला त्यावेळीं आनंदाची प्रतिमा भासली मला.

चार दिवसानंतरचीच गोष्ट. पुढील महिना नुकताच सुरू झाल्यामुळें माझ्या शेजारींच दुसऱ्या बाजूस कुणाचं तरी नवीन बिऱ्हाड आलें होतें. मी त्याबाबतींत चौकसदार नव्हतों. मुंबईत दर महिन्यास अशी किती-एक बिऱ्हाडें येतात अन् जातात. कोण कुणाची विचारपूस करतो, आणि चौकशी करायला वेळ आहे तरी कुणाला न् कधीं ?

पण नीला एक चमत्कारिक मुलगी होती. मी त्या दिवशीं संध्याकाळीं ऑफिसमधून येऊन खुर्चीवर ' टाईम्स 'चा अंक वाचीत बसलेला पाहून ती माझ्याजवळ आली अन् मला म्हणाली, ' अविमामा, पाहिलंत कां आपल्या शेजारीं नवीन मंडळी रहायला आली ती ! '

' नाहीं. काय पहायचं त्यांत ? ' मी सहजच म्हटलं.

' तसं नाहीं अविमामा, त्यांच्याजवळ कीं नाहीं विमल नांवाची माझ्याच एवढी कुणीतरी मुलगी आहे. किती गोड आहे ती ! मी घेऊन येईन हं तिला उद्यां तुमच्याकडे. '

आणि खरोखरच दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं माझी आवडती नीला विमलला घेऊन आली आणि माझी ओळख करून देतांना म्हणाली, ' हे कीं नाहीं विमल, माझे आवडते अविमामा ! किती चांगले आहेत नाहीं ! ' विमलनें नुसतं हं केलें, माझ्याकडे पाहिलें अन् ती हांसली.

खरोखर विमलसुद्धां त्या दिवसापासून माझ्या आनंदांत भर टाकणारी एक मुलगी निघाली. सकाळ–संध्याकाळ नीला–विमल माझ्याकडे येत

आणि प्रेमळपणानें माझ्याशीं गप्पागोष्टी करून, इकडचे तिकडचे शेकडों प्रश्न विचारून आनंदानें वागडत अन् मलाही आनंदीत करीत.

पण हा मनुष्यस्वभाव नाहीं कां, कीं दोन सारख्याच स्वभावाच्या प्रेमळ प्राण्यांना एकाच व्यक्तीकडून किंचित फेरफरकानें नकळत कां होईना पण निरनिराळी वागणूक मिळावी! आणि हाही मनुष्य स्वभावच नाहीं कां कीं, तशा स्थितींत त्यापैकीं एकीनें दुसरीच्या सुखाचा थोड्याफार प्रमाणानें हेवा करावा! बालपणांतील खेळकर स्वार्थी बीजारोपणांतून मानवी स्वभावाच्या मत्सराचा वृक्ष उगम पावतो.

मला नीला काय कीं विमल काय दोन्हीं सारख्याच वाटायच्या. दोघीनाही मी सारख्याच प्रेमळपणानं वागवी, गोष्टी सांगे, त्यांच्याबरोबर खेळत असे. पण माझ्या सूक्ष्म निरीक्षणांत नीलेशीं वागतांना पूर्वी न दिसून आलेली मत्सराची दुःखप्रद झुळूक दिसूं लागली. सौंदर्योपासनेच्या बाबतींत एवढेंच नव्हे तर इतर अंगविक्षेपांत अन् चालण्या बोलण्यांत नीला विमलपेक्षां किंचित् सरसच होती. पण स्त्री निर्माण करतांना ब्रह्मदेवानें असूयेच्या झऱ्याचें पाणी त्यांच्या बाजावर शिंपडलें असावें. कुठच्यान् कुठच्या कारणास्तव विमलच्या हावभावांत नीलेसंबंधीची असूया दिग्दर्शित होत असे. विमलला वाटे कीं, आपणाला अविमामानें गोष्टी सांगाव्या, आपल्याबरोबर हंसावं, बोलावं, खेळावं आणि आपल्या एकटीलाच सिनेमाला घेऊन जावं. मला गाण्याची किंचित् आवड असल्यामुळें मी कधींकधीं नीलेला गाणं म्हणण्यास सांगे. अशा वेळीं माझ्या सांगण्याची वाटही न पहातां विमल गाणें म्हणण्यास सुरवात करी. तिचंही कांहीं गाणं वाईट नसे. आवाजही फार गोड होता. पण नीला! दोघींची एकमेकांशीं तुलना करतांना नकळतच नीलेला माझ्याकडून जास्त मार्क्स पडत.

आयुष्याचीं दोन वर्षें नीला–विमलच्या गोड सहवासांत मोठ्या आनंदानें घालवलीं. त्यांच्या बालिश कृती–प्रकृती अद्यापहि, कितीतरी वर्षांनीं माझ्या नजरेसमोर स्पष्टपणें दिसताहेत. इतका विरहाचा चटका त्या दोन मुलींनीं माझ्या हृदयाला लावला होता.

मला पक्कं आठवतं, त्या दिवशीं शुक्रवार होता. मी ऑफिसमधून नुकताच आलों होतों. धांवतच नीला माझ्या खोलींत आली मुकाट्यानं माझ्या खुर्चीजवळ उभी राहिली. मी आश्चर्यानें तिच्याकडे पाहिलें. तिनं रडण्यास आरंभ केला. मी विस्मयचकित झालों, आजपर्यंतच्या माझ्या सहवासांत नीलेला पहिल्यानेंच मी रडतांना पहात होतों. मी तिला जवळ ओढलं, माझ्या मांडीवर बसवलं अन् विचारलं ‘ बाळ नीला, काय झालं रडायला ? मारलं कां कुणी ? अन् विमल कुठं नाहीं दिसत तुझ्याबरोबर ती ? ’

नीला स्तब्धच होती.

मी तिचे कपोलभागावरून भुरभुरणारे केस मागें सारले अन् प्रेमळ-पणानं म्हटलं, “ नीला, बाळ मला नाहीं का सांगणार ? ”

नीलेनं विळखाच घातला माझ्या गळयाभोंवतीं.

“ अविमामा, उद्या आम्हीं चाललों सातारला. बाबांची बदली झाली म्हणे तिकडे. तुम्हीं येत नाहीं कांहो आमच्याबरोबर ? चला ना ? ”

आणि हें सांगितल्याबरोबर ती कां रडत होती हें समजलें. तिच्या वडि-लांची सातारला बदली झाल्यामुळें ती सर्व मंडळी दुसऱ्याच दिवशीं तिकडे जाणार होती. अर्थातच माझा नीलेला सहवास मिळणार नव्हता आणि त्यासाठींच ती रडत होती.

‘ बाळ येईन बरं मी तुझ्याबरोबर ! मग तर झालं ना ? ’ पण आतां रडायचं नाहीं हं ! हांस पाहूं एकदां. ’

—आणि खरोखरच मी तिच्याबरोबर सातारला येणार असें आश्वासन मिळतांच तिचं रडणं थांबलं आणि ती चटकन् हांसली किती सुंदर हास्य होतं तिचं त्यावेळीं. जणूं काय पावसाच्या सरीवरसरी पडल्यानंतर आकाशांत चमकून दिसणारं आल्हाददायक सप्तरंगी इन्द्रधनुष्यच !

आणि ऑफिसमधून आठवड्याची रजा काढून नीलेला सातारला पोंहोचविलं व परत दिवाळीला येईन असं तिला वचन देऊन परत मुंबईला आलों त्या दिवशींचीच गोष्ट.

मी खोलींत शिरतांच विमल धांवतच माझ्याकडं आली आणि

ओक्साबोक्शीं रडूं लागली. मला वाटलंच कीं तिची बालमैत्रीण नीला सातारला गेली व मीहि सहासात दिवस मुंबईस नसल्यामुळें उत्पन्न झालेल्या विरहाचेंच तें रुदन होय.

मी तिला जवळ घेतलं व नानाप्रकारें तिचं सांत्वन केलं. ती शान्त झाली, हसूं खेळूं लागलीं व मलाहि आनंदित करती झाली.

पण त्या दिवसापासून मी तिचं निरीक्षण केलें. तिचा आनंद कांहीं निराळ्याच स्वरूपाचा होता. आणि त्या स्वरूपाचं दिग्दर्शन मला त्यानंतर थोड्याच दिवसांत झालें.

आपल्या माझ्या बरोबरीच्या गोड सहवासांत मिठाचा खडा टाकणारा तिचा प्रतिस्पर्धी त्या दिवसापासून सातारला वावरत होता.

हेंच तिच्या आनंदाचें कारण होतें आणि तें समजतांच मला किंचित् हसूं आलें.

पण त्यावेळीं मला स्त्रीच्या मनाचें कल्पनातीत आश्चर्य वाटलें.

---

वैनतेय—३ जानेवारी १९३९.

## ५ : : सुखाचे क्षण

एवढीशी विमल. पण मी तिच्या घरीं गेलों कीं काय आनंद व्हायचा तिला ! मी दिवाणखान्यांत पाऊल टाकलं कीं तिनें चटकन् येऊन माझे हात पकडावेत अन् म्हणावं, " किशोरमामा, तुम्ही लवकर लवकर येत नाहीं कांहो आमच्याकडे ? '

आणि मी खुर्चीवर बसलों कीं तिनें चटकन् उडी मारून माझ्या मांडीवर आसन ठोकावं, माझ्या गळ्याला आपल्या इवल्याशा हातांचा विळखा द्यावा आणि म्हणावं, " आतां मी तुम्हांस जाऊं देणारच नाहीं " आणि असं म्हणत माझ्या चेहऱ्याकडे हंसतमुखानें एकसारखी आपली नजर रोखावी.

फार आनंद व्हायचा मला तिच्या त्या गोड बोलण्यानें. मी सहजच विचारावं, " विमल मला आतां गाणं म्हणून दाखविणार ना ? " तर ती लगेच म्हणे, " माझ्यापेक्षां अक्काचींच गाणीं तुम्हाला जास्त आवडतात. खरं ना हें ? मी आणते हं बोलावून तिला. " असं म्हणून ती चटकन् घरांत पळून जाई.

तिच्या अल्लडवृत्तीची मला फार मजा वाटे. तिचा सदा हंसरा अन् आनंदी चेहरा मला मुग्ध करी आणि तिचे लडिवाळपणाचे प्रेमबोल

मला जगाच्या अस्तित्वाची, तिच्या सहवासांत असल्यावेळीं, अंधुकशी कल्पना नाहींशी करीत. देवाघरची ही गोजिरवाणी हालती बोलती फुलवेल तशीच रहावी, असें मला नेहमीं वाटे आणि त्याप्रमाणें मी नेहमीं परमेश्वराजवळ प्रार्थना करी. पण लागलंच विश्वांतील प्रत्येक वस्तूमात्राची क्षणभंगूरता स्थिति चटकन् माझ्या नजरेपुढून निघून जाई आणि मी विषण्ण मनानें तासन्तास विचारांत मग्न होऊन रहात असे. कॉलेजमधून घरीं आल्यावर मला थोडंसुद्धां करमत नसे. लगेच मी विमलच्या घरीं धांव घेई.

तिचा तो गोड, बालिश, हंसरा चेहरा, काळेभोर डोळे, भव्य भालप्रदेश, वाऱ्यानें भुरभुरणारे कुरळे पिंगट केंस, तिच्या नाजुक गुलाबी गालावर ती हंसतेवेळीं पडणारी लहानशीच खळी, एकादा प्रश्न विचारतेंवेळीं मान तिरपी करून अन् भुवया किंचित् वक्र करून, लडिवाळपणानें केलेला अभिनय, सारं सारं मला एका दृष्टिक्षेपांत मुग्ध करी.

आणि त्यापेक्षांहि सुधेकडे माझा ओढा जास्त होता हेंहि छोट्या विमलला माहित होतें व गोष्ट होतीहि तशीच. सुधेनें यौवनाभरांत पदार्पण केलेलें असलें तरी तिच्यांतसुद्धां विमलसारखीच बालिश व अल्लडवृत्ती असलेली माझ्या दृष्टोत्पत्तीस येई. फार अभिमान वाटे मला तिचा सहवास लाभल्याबद्दल. रक्ताची बहीण नसली तरी माझ्या भाग्यानें मला प्रेमाची भगिनी मिळवून दिली होती.

तिचा काळा केशभार, पाठीवरून रुळणारी लांबलचक वेणी, तिच्याच टोंकाला बांधलेले झुपकेदार गोंडे, गळ्यांत एकच पांढऱ्या मण्यांची माळ, भालप्रदेशावर दिसणारी बारीकशी टिकली, किंचित् लांबट चेहरा, मध्यम बांधेसूद शरीरयष्टी, माझ्याशीं बोलतांना ओठावर उमलणारें हास्य, तिची थोडीशी थट्टा करतांच आंतून होणाऱ्या गुदगुदल्यांचा चेहऱ्यावर उमटणारा प्रेमभाव आणि त्या वेळींच "इश्श, हें रे काय!" असं म्हणत लज्जित चेहऱ्यानें पण लटक्या रागानें तिनें मानेस दिलेला गिरका, ह्या साऱ्या गोष्टी माझ्या तिच्याविषयींच्या आपुलकीच्या भावनेला पुष्टी देत.

सुधा!—खरोखरच ती सुधा होती, माझ्यावर तिचं किती निर्मळ

प्रेम, ! किती गाढ विश्वास, अन् किती तरी पटींनीं हृदयाच्या कप्पांत मंदगतीनें जळत असलेला जीवनाधारांचा नंदादीप ! माझ्यावरील तिचें प्रेम शुद्ध अन् निर्विकार होतें.

पण माझ्या मनांत शंका येई, "परमेश्वरानें भूतलावर पाठवून दिलेल्या या दोन सुंदर मुग्ध कलिका अशाच राहतील कां ? तिचं माझ्यावरील प्रेम असंच निर्मल राहील कां ?–अन् प्रतिक्षणीं तिला माझ्या-विषयीं होणारी आठवण तिला पुढेंहि होईल कां ? कलिका उमलतात आणि जगाला आपला भरपूर आस्वाद देण्यापूर्वीच कोमेजून जातात; तसंच नाहीं कां यांचें, हा विचार मनांत येऊन तें मन खिन्न होई. सुधा विमलला नेहमीं सुखांत ठेवावें म्हणून मी फार जपत असे आणि तीं आनंदांत असलीं कीं मलाहि आनंद होत असे.

त्या दिवशीं मी कॉलेजमधून घरीं आल्यावर नेहमींप्रमाणें सुधेच्या घरीं गेलों. छोटी विमल आपल्या छोट्या बाहुलीशीं कायसं करित होती. मला पहातांच ती धांवतच मजजवळ आली.

"किशोरमामा, चला ना !" आणि तिनें मला ओढण्यास आरंभ केला.

"कुठं बाळ ? अन् आज सुधा कुठं दिसत नाहीं ती ?"

"किशोरमामा, अक्का आंत कायतरी वाचते आहे ! मी तिला माझ्या-बरोबर खेळण्यास बोलाविलें पण ती येत नाहीं. तुम्हीं चला ना ! माझ्या छोट्या बेबीचें लग्न आहे. चला."

अति आग्रहामुळें मी बेबीच्या लग्नाला गेलों. चिंध्यांच्या उंची वस्त्राभरणांनीं वेळील्या गेलेल्या वधुवरांवर मी तांदूळ–वृष्टी केली. विमल-बरोबर वधुवरांसाठीं तयार केलेल्या भोजनास बसलों आणि नंतर सुधेला पहाण्यासाठीं आंत निघालों.

"किशोरमामा, आतां नवरीला नवऱ्याच्या घरीं न्यायला नको का ? याल तुम्ही त्यावेळीं ?"

मी हसत 'हो' म्हटलं आणि आंत गेलों. जातांना लग्नसमारंभाची समग्र माहिती असलेल्या छोट्या विमलच्या बुद्धिविषयीं मला विलक्षण आश्चर्य वाटलें.

सुधा आंतच एका इझिचेअरवर बसून कसलेसें पुस्तक वाचित होती. मला पहातांच ती उठली.

" केव्हां आलास किशोरभाई? अन् आज लवकरसा आलास? कॉलेजला सुट्टी कीं काय? कां? एकाद्या प्रोफेसरचं लग्न ठरलं म्हणून रजा!"

" रजा नाहीं पण डोकं फार दुखत होतं म्हणून आलों घरीं. पण झोंप येईना अन् वाचनाकडे लक्षहि लागेना; म्हणून इकडे आलों."

" मग बाम चोळूं कां? अंमळ बरं वाटेल!"

" तसं कांहीं नाहीं, आतां बरं आहे एवढेंच नव्हे, तर आतांच विमलनें आपल्या छोट्या बेबीचं कुणाशींतरी लग्न केलं त्याचें जेवण जेवूनसुद्धां आलों " मी थट्टेनें म्हणालों.

" आतां ह्या लग्नावरून आठवण झाली, " तिनं सुरवात केली " हें पाहिलेंस भाई, कमलचं लग्न ठरलं म्हणे. बरं मिळालं स्थळ तिला. नवरा कुठशी प्रॅक्टीस करतो."

विषयाला निराळीच गती मिळालेली पाहून मला आश्चर्य वाटलें.

" मग तुला वाईट वाटलं वाटतं त्याबद्दल. तुझ्यासाठींही पाहीन बरं हं!" मी तिची थट्टा करण्यासाठीं सहजच म्हटलं.

" माझ्यासाठीं तूं नको कांहीं एवढा त्रास करून घ्यायला! आणि मी सांगतें मी लग्नच नाहीं करणार मुळीं! अशीच तुझी बहीण म्हणून रहाणार!"

" म्हणजे लग्न झाल्यावर बहिणीचं नातं नाहींसं होत·वाटतं?"

" नातं रहात रे, पण तुला वाटणारा माझेविषयींचा जिव्हाळा, आपलेपणा, माया सारं नष्ट होतं. लग्न केल्यावर तुझ्यासारख्या प्रेमळ बंधूची प्रेमाची पांखर नाहींशी होईल?"

" तसं नव्हे! पण मला मात्र दुसरी एकादी बहीण शोधावी लागेल."

" हो खरंच! आणि मग माझ्या गरीब भाईला कोण विचारील."

मला खरोखर अंतर्यामीं आनंद व्हायचा तिच्या अशा बोलण्याचा. पण मनांत सारखी विवंचना लागली होती. प्रेमाचें द्योतक आणि प्रीतीचें

चिन्ह तिचें लग्न होऊन गेल्यावर कोणत्या रीतीनें प्रगट होईल? मोठ्या लोकांच्या सत्कृती, त्यांची जनतेंत जागृत असलेली स्मृति अगर आठवण त्यांच्या पश्चात् प्रगट करतात. स्मृती हें प्रेमाचं, मायेचं, प्रीतीचं चिन्ह समजलं जातं. सुधा आपल्या घरीं गेल्यावर तिची दरदिवशीं होणारी आठवण हीच माझं तिच्यावर असलेलं अनुपमेय प्रेम प्रकट करूं शकेल. सुधा—"

इतक्यांत मला वरातीला बोलावण्यासाठीं विमल आंत आली.

" बाळ, तुला एक गंमत सांगू?" मी विचारलें.

" कसली किशोरमामा?"

" तुझी अक्का म्हणे लवकरच लग्न करणार!"
मी हंसत म्हणालों व त्याचा काय परिणाम होतो हें पहाण्यासाठीं सुधेच्या चेहऱ्याकडे नजर लाविली.

" होय ग अक्का? आणि मग तूं नवऱ्याच्या घरीं केव्हां जाणार?"

" उगीच ग! कांहींतरी किशोरभाई बोलतो आहे."

" खरंच बाळ! पण ती म्हणते कीं तुला आपण बरोबर नेणार नाहीं."

" मग मीसुद्धां तिच्याबरोबर जाणार, आणि तूंहि किशोरमामा आलं पाहिजेस आमच्याबरोबर! तूं नसलास कीं अक्काला कसं चैन पडत नाहीं! होय ना ग अक्का?"

" हं!" अक्कानें, अर्थात् माझ्या प्रेमळ सुधाताईनें, नुसता होकार दिला. त्यांत दुःखाची छटा पूर्णपणे उमटलेली होती.

" म्हणजे मी नसलों कीं तुला चैन पडतं असंच कीं नाहीं?" मी मुद्दाम विमलला चिडवावें म्हणून म्हणालों.

" मलाहि तूं फार आवडतोस रे किशोरमामा, चल ना बाहेर वरातीला."

माझे हात तिनें पकडलेच आणि ती चालूं लागली. मीहि विचार करित चाललों होतों.

" किती किती हीं प्रेमळ भावंडं!—आणि किती निर्मल अन् निष्पाप! पण हीं अशीच राहतील कां? जगांतील चराचर वस्तू अखंड बदलत

असतात, क्षणभंगूर जीवन असतं त्यांचं ! तसंच मानवी जीवनाचें नाहीं कां ? आज आनंदांत बागडताहेत. उद्यां—उद्यां कदाचित्......"

आणि असे विचार मनांत येऊन मला सुधा—विमलची आठवण होई आणि मनास वाईट वाटे.

त्या दिवशीं माझा बी. ए. चा रिझल्ट लागला अन् त्यांत मी फर्स्ट-क्लासमध्यें उत्तीर्ण झालों. मला आनंद झाला व ही आनंदाची बातमी ऐकून विमलच्या अक्काला होणारं सुख ह्याहूनहि जास्त असणार या कल्पनेनेंच माझा तो आनंद द्विगुणित झाला. मी तावडतोब विमलच्या घरीं गेलों.

धांवतच आली विमल माझ्याकडे. किती आनंद झाला होता तिला मला पाहून ! तिनं चटकन् विचारिलं "किशोरमामा तुम्ही पास झाला ना ? पेढे नाहीं कुठं आणले ते ? अक्का सारखी वाट पहात आहे तुमची. चला ना लवकर !" तिनें माझे हात पकडले व ती आंत चालूं लागली.

बाहेरच्याच दिवाणखान्यांत सुधा बसली होती. वाटच पहात होती माझी ती. विमलचीच मोठी बहीण होती ती. तिचंच प्रतिबिंब. मग विमलचेंच अनुकरण सुधेनें केलं तर नवल नाहीं.

"रिकाम्या हातांनींच आलास ना ?"

तीच भाषा अन् तेंच हास्य. मला कितीतरी समाधान वाटलं. सख्या बहिणीनेंसुद्धां मला इतका आनंद दिला नसता. नेहमीं माझ्या-बरोबर खेळायचं, हंसायचं अन् मनाला रंजित करायचं. मला हंसूं आलं तिच्या विचारण्याचें.

"पेढे पाहिजे कां तुला ताई ! आतांच मागल्या पावलीं जातों अन् घेऊन येतों."

"आतां नको कांहीं जायला ! भाई तूं आलास कीं मला कशाचीहि गरज नाहीं."

किती प्रेमळपणा ! केवढी भावकता ! केवढें माझ्यावर प्रेम !

"पण किशोरमामा, आज सिनेमाला जायचं ना ! तुम्ही मागं सांगितलंत कीं परीक्षेचा चांगला रिझल्ट लागतांच आपण सिनेमाला जाऊं म्हणून." विमलचे गोड बोल बाहेर पडले.

" नको ग विमल ! इथंच आम्हीं आज गप्पा मारूंया ! सिनेमाला पुढें केव्हांतरी जाऊं. होय ना रे भाई ? "

" अस्सं ग काय करतेस अक्का ? इश्श, मला नाहीं या गप्पागोष्टींत मजा वाटत. चला तुम्ही अन् मी जाऊंया सिनेमाला किशोरमामा. बसूं दे अक्काला इथंच गप्पागोष्टी करीत."

मला मजा वाटायची त्यांचीं अशा प्रकारचीं प्रेमाचीं भांडणं ऐकायला. प्रीतीचे बोल असायचे त्यांचे ते. मला वाटे असंच भांडण अखंड चालेल तर बरं.

जीविताच्या हिरवळीवर उगवलेलीं दोन फुलं होतीं तीं. मानवसमाजाला आणि ज्ञाति–बांधवांना आपल्या गोडबोलांत सुख द्यायचं हा त्यांचा रोजचा व्यवहार. तोच व्यवहार आजही माझ्या दृष्टीस पडला. पण– पण कांहीं वेळपर्यंतच. संध्याकाळ होतांच दुसऱ्या दिवशीं येण्याचें आश्वासन देऊन मी घरीं परतलों.

माझ्या जीविताच्या बगीच्यात उगवलेलीं दोन फुलें. त्या दोन फुलांकडे पाहून मी समाधान मानी, पण मनांत विचार येई, " कांहीं झालं तरी फुलंच तीं. कांहीं कालपर्यंत सतेज अन् टवटवीत दिसायचीं अन् संध्याकाळ होतांच कोमेजून जायचीं. " ह्या जीवन–फुलांचें असंच नाहीं कां होणार " माझ्या मनांत कल्पना उगवे. " तारुण्याचा दिनकर जोंपर्यंत अस्तंगत झाला नाहीं तोंपर्यंत त्यांची टवटवी अन् तेज ! यौवनावस्थेचा आनंद फुलाप्रमाणेंच क्षणभंगूर नाहीं कां ? आणि त्याच्या पश्चात् ? "...

मनास फार यातना होत माझ्या, मी असा विचार केला कीं.

त्या दिवशीं मनास फारच वेदना झाल्या. नोकरीसाठीं वडिलांनीं मला मुंबईस पाठविण्याचें ठरविलें. मुंबईसारख्या वैभवसंपन्न शहरांत जाण्यास आनंद झाला, पण किती क्षणिक.

आठवण झाली सुधा–विमलची मला त्यावेळीं; अन् आनंदाचा विचार भरकन् गेला डोळ्यापुढून माझ्या.

संध्याकाळींच मी विमलच्या घरीं गेलों.

" काय सांगायचं त्यांना ? " मनांत विचार आला. " माझ्या सहवासांत मला आनंद देणारीं अन् आपणहि आनंदानें डोलणारीं तीं दोन निसर्गाचीं सजीव सुमनें मी मुंबईस गेल्यावर कोमेजून नाहीं का जाणार ? सहस्ररश्मि दिवसाचें आपलें राज्य चालवून अस्तंगताच्या मार्गावर असतांना निसर्ग–सुमनांचे असंच नाहीं कां होत ! "

" मला चमत्कारिक वाटूं लागलं. आंत शिरतांच मी चटकन् विमलला उचललें अन् तिच्या चेहऱ्याकडे पहातच राहिलों. समोरच विमलची अक्का सुधा–होय सुधाच—उभी होती; किती निष्पाप अन् सुकुमार बालिका ती ! जणूं काय जीवितमंदिराच्या कुंपणावर चढत असलेली चित्र-रंगेची नाजुक लताच ! मी एकसारखा इकडूनतिकडे त्यांच्याकडे पाहूं लागलों. डोळे पाण्यानें डबडबून आले. सुधेनें माझ्या डोळ्यांतील तो अश्रूझरा पाहिला.

" किशोरभाई, रडतोस तूं ? कां ? काय झालं सांग ना मला. "

त्यांचा सहवास मला अतरणार. काय सांगूं त्या निष्पाप फुलांना ! माझ्या तोंडांतून शब्दच बाहेर पडेना.

" भाई, आमच्यावर रागावलास कारे ? रडतोस कां मग ? कोण बोललं कां तुला ? "

सुधेला काय अन् कसं सांगावं ! आतांपर्यंत सारं आयुष्य तिच्या सहवासांत गेलेलं. विमलची दृष्टी तर माझ्या दृष्टीवर खिळून बसली.

" किशोरमामा, रडतोस तूं ? मीं एखादं गाणं म्हणूं कां ? "

विमलचे बोल ते ? किती मृदु, किती हळुवार अन् किती प्रेमळ ! मला रहावेना.

" ताई, मी उद्या मुंबईस जाणार ! तुमचा निरोप घ्यायला आलों." माझ्या तोंडांतून शब्द बाहेर पडले.

स्तंभितच झाले ते दोन जीव. जणूं काय वाऱ्यावर आनंदानें डोलणाऱ्या नाजुक फुलांना कुणीतरी येऊन आपल्या राकट कणखर बोटांनीं चटकन् खुरडावं.

" मग आम्ही काय करावं रे भाई ? "

" किशोरमामा, कशाला रे जातोस तूं मुंबईस ? मी येऊं कां तुझ्या-बरोबर ? "

लहान बालिकाच ती. तिला तरी आपल्या अक्काविषयीं निःस्वार्थी-पणाची कल्पना कशी यावी ?

" ताई, इलाज नाहीं ! मला नोकरीसाठीं गेलंच पाहिजे. पत्र पाठ-वीनच. येतों मी, विमलला संभाळ बरं. "

कसेबसे तोंडांतून शब्द निघाले माझ्या. पण उठण्याची कृति मात्र होईना. विषण्ण मनःस्थितींत कितीतरी वेळ मी तसाच खुर्चीवर बसून होतों.

सुधा–विमल दोन निष्पाप निर्मल सुमनें–त्यांच्याही नयनपत्रांवरून टप् टप् अश्रू गळत होते. जिकडे–तिकडे निराशेचा अंधार दिसला मला त्यावेळीं.

" खरंच, मी गेल्यानंतर या दोन जीवांचें काय होईल–" मी विचार करूं लागलों. कल्पनाच करवेना मला त्यांच्या स्थितीची ! त्यांचे केविल-वाणे चेहरे माझ्या नजरेपुढून हालेनात. त्यांचा गतेतिहास माझ्या दृष्टी-पुढून हळुहळु सरकूं लागला. दुःखाची जाणीव मला तीव्रतेनें भासूं लागली. विचारयंत्र डळमळूं लागलें. त्याचक्षणीं विमलला मी चटकन् जवळ ओढलं आणि तिच्या चेहऱ्याकडे पहात ढळढळा रडूं लागलों.

कितीवेळ रडत होतों हें माझें मलाच माहित नव्हतें. पण सुधेनें मला भानावर आणलें.

" भाई, रडतोस काय असा वेड्यासारखा ? चल ऊठ, पूस ते डोळे. घरीं जायला तुला उशीर झाला नाहीं का ? "

खरोखरच मला त्यावेळीं उशीर झाला होता. मी उठलों आणि " विमल–सुधा, येतों मी, कांहीं जरूर लागल्यास कळवीत जा. पत्र पाठवीनच मी. " असे तोंडांतून शब्द काढले. विमलचें चुंबन घेतलें आणि विषण्ण मनानें घरीं परतलों.

किती आनंद व्हायचा सुधेचं पत्र वाचून ! दर आठवड्यास मी मोठ्या अधिरतेनें पोष्टमनची वाट पहायची. मुंबईस बड्या ऑफीसरची

मला नोकरी मिळालेली. पण टेबलावर ठराविक पद्धतीचें पत्र पाहून माझं हृदय उचंबळून येई आणि मोठ्या अधीरतेनें मी सुधेचें पत्र फोडून वाचीत असे. नोकरलोक आणि हातांखालील क्लार्कस् माझ्याकडे पाहून हंसत.

"आज साहेब खुषींत दिसताहेत, कदाचित् तिकडून पत्र आलं असावं!" कुणीतरी आपला तर्क लढवावा.

किती आनंदानें मी दोन वर्षांचा काळ सुधेचीं पत्रें वाचून घालविला. भगिनीप्रेमाला आंचवलेल्या मनुष्याला मानलेल्या बहिणीच्या हृदयाचे प्रेमबोल किती सुखद होत असतील याची यथार्थ कल्पना दुसऱ्या कुणाला बरं करतां येईल! सुधा अन् विमल, दोन कोंवळे किरण जगाच्या पृष्ठ-भागावर आपलं तेज फेंकीत होते आणि मी एकटाच त्या किरणांच्या आल्हाददायक प्रकाशानें काळाच्या प्रवाहांत स्वैरसंचार करीत होतों. त्या दोन जीवांचीं मुखकमलें माझ्या स्मृतीपटलाच्या जलपृष्ठावर आनंदानें डोलत होतीं. मनाच्या वालुकामय प्रदेशांत सुधा–विमलचीं प्रतिबिंबें ठळक रीतीनें उमटलीं होतीं.

त्या दिवशीं मी ऑफिसमधून आलों. खोलींत टेबलावर सुधेचें पत्र पडलेलें होतें. पत्रांतील मजकूर वाचून मला आश्चर्यच वाटलें. सुधा लवकरच पत्नी होणार होती. लग्नाचा मुहूर्त पंधरा दिवसांवर असून मला रजा घेऊन येण्याबद्दल तिनें आग्रहानें लिहिलें होतें. अर्थात्च मी रजा घेतली व सुधेच्या घरीं गेलों.

लग्न यथासांग पार पडलं. सर्व विधि आटोपले. मी मुंबईस येण्यास निघालों. सुधा आपल्या घरीं जाण्यास निघाली. प्रश्न होता विमलचाच. पण शेवटीं तिनें आपल्या अक्काबरोबर जाण्याचा विचार केला.

"भाई, तुझ्या ताईस आशीर्वाद दे!" घरीं जातेवेळीं निरोप घेण्यासाठीं सुधेनें मला साष्टांग नमस्कार केला.

"ताई, अष्टपुत्रा सौभाग्यवती भव!" मी आनंदानें आशीर्वाद दिला. पण कां कुणास ठाऊक, माझ्या डोळ्यांतून अश्रू मात्र गळाले. आणि ते सुधेच्या नजरेंतून सुटले नाहींत.

" भाई, मीं घरीं जात असतांना तूं रडतोस ? "

" कुठं, उगीचच ? " मी हंसण्याचा प्रयत्न केला.

आज या गोष्टीला आठ वर्षं झालीं. सुधाविमल आपापल्या 'घरीं' आहेत. माझ्या आयुष्यांतील त्यांचा आनंद मावळला. सुखाचे क्षण लोपले. पण गतगोष्टींचीं आठवण केल्यावर स्मृतिपटलावर चित्रें डोळ्यांनीं पाहिल्यानंतर न जगणं अशक्य होतें. आणि सुधा-विमल-बरोबर घालविलेले सुखाचे क्षण माझ्या चालू उदास, असार जीवनाला सुखाचा, आनंदाचा झटका देतात आणि मनांत विचार येतो कीं त्यांच्या पश्चात् अगर माझ्या पश्चात् कुणाचं कसं होणार! सुधा-विमलचें पश्चात् आयुष्य अन् माझें पश्चात् आयुष्य यांत स्मृती-सुखांनीच काय तो फरक केला आहे.

---

चित्रा—१४ आगष्ट १९३८.

## ६ : : असहाय्यता

वत्सला विल्सन-कॉलेजच्या पायऱ्या उतरली तीच किती अधिरतेनें आणि अभिमानानें. आज तिनें अपूर्व विजय मिळविला होता. मराठी वाङ्मयोत्तेजक मंडळातर्फे भरलेल्या वक्तृत्वाच्या चढाओढींत तिला पहिल्या नंबरचें बक्षिस मिळालें होतें. आणि कोणत्या विषयावर ? ' समता.' स्त्री ही पुरुषांबरोबरीची आहे आणि ती भावी काळांत पुरुषांबरोबरीचीच रहाणार, असं मत तिनें प्रतिपादन केलें होतें. किंबहुना तिचं असें म्हणणें होतें स्त्री ही शारीरिक सामर्थ्यांत पुरुषांच्या वरचढ नसली तरी इतर बाबतींत खात्रीनें ती भावी कालांत त्याच्यावर ताण केल्याशिवाय रहाणार नाहीं.

त्याच अभिमानांत ती घरीं येत होती. तिच्या चेहऱ्यावर स्पष्टपणें उमटलेला अहंकाराचा झणकारा तिच्याकडे पहाणाऱ्यांच्या नजरेस खात्रीनें दिसला असता. चालतांनासुद्धां ती एकेक पाऊल मोठ्या अभिमानानें टाकत होती.

कॉलेजच्या फाटकापाशींच तिला पहातांच तिला अरविंद भेटला. तो किंचित् हांसला. तिचं त्याच्याकडे लक्षहि नव्हतं. ती आपल्याच तोऱ्यांत चालली होती.

" छान झालं हं आपलं भाषण. " तो तिच्याकडे पाहून म्हणाला.

" खरंच ? आवडलं तुम्हाला ? " आतां तिचं त्याच्या बोलण्याकडे लक्ष गेलें आणि तिनं प्रश्न केला.

" फारच चांगलं बोलला तुम्ही; पण भाषणांतील मुद्दे मला फारसे पटले नाहींत ! "

" कां पटतील ? पुरुष ना तुम्ही ! " तिनें अभिमानानें आपली मान किंचित् ताठ केली आणि पाठीवरील वेणीचा लांबलचक शेपटा झटकन् अंगाला एक झटका देऊन खांद्यावरून पुढें आणला.

" पण त्यांचाच आश्रय धरतां शेवटीं तुम्ही ! " तो शांतपणें बोलला. त्याच्या चेहऱ्यावर रागाची किंचित्हि छटा दिसत नव्हती.

" छट् ! कां धरावा आम्ही ! पुरुषांचा आश्रय ! मला तर जरूरच नाही पुरुषांची ! " तिच्या आवाजांत रागाची छटा पूर्णपणें दिसत होती आणि बोलण्यांत स्त्रीविषयींच्या अभिमानापेक्षां पुरुषांची हेटाळणीच फार होती.

" राग आलेला दिसतोय तुम्हांला माझ्या बोलण्याचा."

" राग कशाला येईल ? पण सारे पुरुष सारखेच ! " तिनें चांगल्यापैकीं टोमणा मारला.

" बरं आहे ! दिसेल लवकरच तुमची पुरुषांबद्दलची अरेरावी ! '

" पहा कीं ! मी कुठं नको म्हणतें ! " तिचा स्वाभिमान किंचित्ही कमी झाला नव्हता. तिनं पाहिलं, अरविन्द शान्त चित्तानें तिचं बोलणं ऐकत होता. तिच्या अरेरावीपणाबद्दल त्याला किंचित्हि राग आला नाहीं अगर वाईट वाटलं नाहीं. उलट तिलाच तिच्या अरविन्दाशीं झालेल्या बोलण्याबद्दल वाईट वाटलं. " उगाच आपण असं बोललों ! " ती मनाशीं म्हणाली.

" चला, चहा घ्यायला येतां ? तापलेलं मस्तक थोडं शांत करूं या. "

" माझं डोकं तापलेलं नाहीं ! तुमचं असेल कदाचित् ? "

" कदाचित् कशाला ? आहेच ! " ती तोऱ्यांत म्हणाली.

" मग चहा घेऊन शान्त होणार नाहीं तें ! त्यापेक्षां आईस् बॅग ठेविली तर जास्त चांगलं ! "

" मला कांहीं भ्रम झाला नाहीं आईस्-बॅग डोक्यावर ठेवायला !"

" तुम्हीच तर म्हणाला !"

" बरं तें राहूं द्या ! चहा घ्यायला येतां ?"

" तुमच्याकडून जर चहा मिळत आहे तर तो घेण्यांत मला आनंदच वाटेल." त्यानें उत्तर दिलें.

" कां ?" किंचित् वांकडी मान करून तिनें विचारिलें.

" कां ? कारण तुम्हीं स्त्री-स्वातंत्र्याच्या पुरस्कर्त्या आहां म्हणून !"

" असूं द्या !" आणि तिनें आपल्या दोन्हीं ओठांस एकप्रकारची विलक्षण मुरड घातली.

दोघेही ' अलाईस् ' हॉटेलमध्यें चहा पिण्यास निघालीं.

अरविन्द आणि वत्सला दोघेहि सिनीअर बी. ए. च्या वर्गांत होतीं. वत्सला जात्याच स्त्रीस्वातंत्र्याची पुरस्कर्ती होती. स्त्रीजातीबद्दल तिला फार अभिमान होता. पुरुषांच्या बरोबरीनें स्त्रियांनीं वागावं, पुरुषांप्रमाणें समान दर्जा स्त्रियांना असावा, अशा तऱ्हेचीं तिचीं मतं होतीं. स्त्रियांनीं पुरुषांना फारसं महत्व देऊं नये, आपणहून पुरुषांच्या बाबतींत आतुरता दाखवूं नये असं ती नेहमीं आपल्या मैत्रिणीस सांगत असे.

आपल्या सौंदर्याचा तिला केवढा अभिमान! लेडीजरूममध्यें मैत्रिणी-बरोबर वादविवाद करतांना ती कितीदां तरी दुसऱ्यांवर टीका करी. त्यांस टोमणे मारी. तिला त्याबद्दल कांहींसुद्धां वाटत नसे.

" आज ती रत्नप्रभा दळवी जॉर्जेटचं किती सुंदर पातळ नेसली होती !" असं कुणीतरी मुलीनें तिच्याजवळ म्हटलं, कीं ती तोंड किंचित् वांकडें करून लागलींच म्हणे, " हं ! काय त्याला नेसणं म्हणतात ! विनाकच्छ नेसली होती आणि पाठींमागून सुरकत्या किती दिसत होत्या !"

आणि दुसऱ्या कुणीतरी म्हटलं, " ती कमल परांजपे ! किती सुंदर अंबाडा घालते ! अन् निळसर पातळांत किती सुंदर दिसते !"

कीं आलंच वत्सलेचं उत्तर, " तुला अक्कल तरी आहे का ? म्हणे कमल किती सुंदर दिसते ! सौंदर्य कशाबरोबर खातात हें तुला अगर तिला माहित तरी आहे का ?"

आणि सौंदर्यावर व स्त्रीस्वातंत्र्यावर ती केवढंतरी लांबलचक व्याख्यान देई. तिच्या साऱ्या मैत्रिणी शान्त चित्तानें तिचं भाषण ऐकत आणि तें संपतांच उठतांना हळूंच एकमेकींना म्हणत, "हुं! काय पण बोलते आहे! उद्यां समजेल लग्न झाल्यावर!" आणि साऱ्याजणी तिच्याकडे पाहून हांसत.

लग्न हा शब्द ऐकल्याबरोबर ती दचके, चवताळे आणि दांतओंठ खात रागानें म्हणे, "लग्न! लग्नाची बेडी पायांत अडकवून घेण्यासाठीं ही वत्सला जन्मलेली नाहीं. तुम्ही लोकांनींच चरणाचे दास व्हावे नवऱ्याशीं! स्त्रीलासुद्धां स्वातंत्र्य हवं असतं!" असं म्हणून ती फणकाऱ्यानें खोलींतून निघून जाई.

कितीतरी विद्यार्थी तिची ओळख करून घ्यायला उत्सुक होते. पण वत्सलेच्या तोंडाचा फटकारा सर्वांना सारखाच बसे. वारंवार ती पुरुषांचा द्वेष करी. एक प्रकारचा पुरुषांबद्दलचा वैरभाव तिच्या मनांत एकसारखा सलत असे.

मागल्या वर्षीच तिची न् अरविन्दाची मराठी वाङ्मयोत्तेजक मंडळाच्या योगानं ओळख झाली होती. आजपर्यंतच्या तिच्या साऱ्या मित्रमैत्रिणींत अरविन्दानेच तिच्यावर थोडाफार विजय मिळविला होता. पण 'स्त्री–पुरुषाबद्दल' चा वाद निघाला, कीं ती अरविन्दाचाहि योग्य तो समाचार घेई.

यामुळें साहजिकच त्यादिवशीं वक्तृत्वकलेंत पहिल्या नंबरचं बक्षिस मिळाल्यामुळें तिचा स्वाभिमान जागृत झाला होता. आणि त्या अभिमानांतच ती अरविन्दाशीं किंचित् बेपर्वाइनें बोलली. पण लगेच तिनें स्वतःला सांवरून घेतलें व आतांपर्यंत आपण कांहीं बोललोंच नाहीं अशा विचारानें तिनें चहा घेण्याचा अरविन्दास आग्रह केला.

"उद्यां येतां ना घरीं?" तिनें हॉटेलबाहेर यतांना विचारलें.

"कां?"

"मग आपण कुठंतरी लांब फिरायला जाऊ?"

"लाज नाहीं ना वाटायची?"

" कशाबद्दल ? " तिनें मान किंचित् मागं टाकून वर पहात म्हटलं.

" मी तुमच्याबरोबर असणार म्हणून ? "

" मग काय झालं ? "

" तसं नव्हे ! तुम्ही सौंदर्यराशी; स्त्रीस्वातंत्र्याच्या पुरस्कर्त्या, आणि कसं वागावं, कसं चालावं, कसं बोलावं, कसा सुंदर ड्रेस करावा इत्यादि चालू व्यवहारांत असलेल्या विषयांच्या प्रोफेसर ! अन् मी ! मी एक साधा धोतराचा ओबड धोबड काचा मारलेला, डोक्यावर टोपी असलेला, सिनी-अर बी. ए. च्या वर्गांतील एक अडाणी विद्यार्थी ! अभिमानाची माझ्याकडे एकच गोष्ट आहे. तुमची ओळख ! मग सांगा फिरायला जातांना जोडी छान शोभेल नाहीं ? "

" असूं द्या तें ! तुम्ही येणार ! कीं नाहीं सांगा. "

" मग नाहीं येणार मला जरा थोडंसं काम आहे. एक्सक्युज हं ! "

आणि इतक्यांत ती प्रार्थनासमाजजवळ येतांच तो चर्नीरोडवर डाव्या बाजूस वळला आणि ती पोर्तुगीज चर्चकडे वळली.

पण अरविंदाला पूर्णपणें ठाऊक होतं, कीं वत्सला आपल्या खोलीवर आल्याशिवाय व आपल्याला नेल्याशिवाय रहाणार नाहीं ! वत्सलेचीही पूर्ण खात्री होती कीं, आपण त्याच्याकडे गेलों तर तो आपलीं सर्व कामें बाजूस ठेवून आपल्याबरोबर फिरायला येईल.

आणि मनांत असा विश्वास बाळगूनच ती अरविन्दाच्या खोलीवर दुसऱ्या दिवशीं गेली. अरविन्द कॉटवर झोंपला होता.

तिनें दारावर टक् टक् केलें. पण दार उघडण्याचें चिन्ह दिसेना. दाराला आंतून कडी नव्हती. तिनें तें किंचित् लोटलें आणि अरविन्द झोंपलेला पहातांच ती हळूच आंत शिरली.

" किती झोंपतां हो तुम्ही अरविंद ! " तिनें खुर्चीवर बसतांबसतां हळू आवाजांत म्हटलं.

त्या बोलण्यानें अरविंद जागा झाला. त्यानें डोळे उघडले आणि पाहिलें. वत्सला त्याच्याकडे निरखून पहात होती. त्यानें शरीराला आळपिळे देत एक मोठी जांभई दिली.

" मला वाटलं चोर शिरला माझ्या खोलींत. " त्यानें किंचित् गंभीर-पणाचा आव आणून म्हटलं.

" मग चोरच आहे मी! पोलिसांना वर्दी नाहीं दिलीत ? "

" आतां जाणार आहे ! "

" तोपर्यंत चोर पळून गेला तर ? "

" मी आहे ना इथं ! मग जाणार कसा ? "

" पण तुम्ही तर आतां पोलीसास वर्दी देण्यासाठीं बाहेर जाणार ! " तिनें हांसत विचारलें.

" मग ! चोरालाही नेणार कीं बरोबर माझ्या. " त्यानें शांत वृत्तीनें उत्तर दिलें.

" मग उठा तर ! चोरच न्यायाला आला आहे तुम्हांला ! "

" कुठं पोलिसचौकीकडे ? "

" कुठं तें मग पाहूं ! अगोदर उठा ! " आणि खरोखरच वत्सला अरविन्दाचा हात धरून त्यास ओढूं लागली.

" असंच उद्यां करणार वाटतं तुमच्या नवऱ्याशीं ! "

" मी मुळीं लग्नच करणार नाहीं. भारी अरेरावीनें वागतात सारे पुरुष ! मला त्यांचा फार राग येतो. "

" मग मीहि पुरुषच आहे कीं ! "

यावर वत्सला कांहीं एक बोलली नाहीं. तिनें नुसतं अरविन्दाकडे पाहिलें, हांसली आणि चटकन् तिनें आपली मान दुसरीकडे वळविली.

आपल्या बोलण्याचा तिच्यावर काय परिणाम झाला हें अरविन्दानें पाहिलें. आपलं बोलणं तिला पसंत पडले नाहीं असं त्यास वाटलं. तिला दुखविल्याबद्दल त्याच्या मनालाच किंचित् वाईट वाटलं.

" आतां थोडा चहा घेतां का ? " तिला बरं वाटावं म्हणून त्यानें विचारलें.

" तुम्ही माझ्याबरोबर फिरायला येणार कीं नाहीं तें अगोदर सांगा ! "

" तुम्ही चहा घेणार असाल तर मी येईन. "

" बरं मग करा ! " तिनें दुसरीकडे पहातच उत्तर दिलें. पुरुषाच्या

हेकेखोरपणाचा तोसुद्धां एक लहानसा मासलाच आहे असं तिच्या मनाला त्यावेळीं वाटलं. आपली अरविंदाबरोबर एवढी मैत्री असतांना त्यानें आपल्याशीं अशा प्रकारें बेपर्वाईचें वर्तन ठेवावें हें पाहून तिला फार वाईट वाटलें.

मुकाट्यानं तिनं चहा घेतला. आपणहून तिनें एकहि प्रश्न विचारला नाहीं अगर त्याच्याशीं बोलली नाहीं. त्यानें विचारलेल्या प्रश्नांनाच ती तेवढीं उत्तरं देत होतीं.

ती त्याच्याबरोबर फिरण्यास गेली. अरविंद त्या दिवशीं धोतरांतच होता. पण धोतराचा त्याने व्यवस्थित काचा मारला होता.

पुरुषांच्या इंडियन ड्रेसविषयीं तिचं तितकसं चांगलं मत नव्हतं. त्यामुळें अरविंदानें आपल्याबरोबर फिरायला येतांना धोतरांत असावं हें तिच्या मनाला कसंसंच वाटलं. ती खोलीच्या बाहेर पडतां पडतां म्हणाली, " परवां शिवायला दिलेला सूट आणलांत ? "

" हो. तो तर कालच आणला, कां ? "

" मग मला नाहीं कुठं दाखवलांत ? "

" उद्यां तो सूट घालून येणार होतों तुमच्या घरीं ! "

" मग आतां कां नाहीं घातलांत ? "

" आला कंटाळा, म्हटलं चला जाऊं असंच. " त्यानें बेपर्वाईनें पण किंचित् हांसत उत्तर दिलें.

" मला नाहीं आवडत हा तुमचा ड्रेस ! किती गबाळा मनुष्य दिसतो धोतरांत ? " तिनें टोमणा मारला.

" मग तुम्हांस लाज वाटते का माझ्याबरोबर फिरण्याची ? तसं असल्यास सांगा. मी आपला परत जातों ! " त्यानें निमूटपणें विचारलें.

वत्सला कांहींच बोलली नाहीं. तिला त्याचा थोडासा रागहि आला. ' मी एवढ्या काळजीनें त्याच्याशीं बोलतें. त्यानें व्यवस्थित राहावं, सूटबुटांत असावं म्हणून एवढी खटपट करतें. पण त्याबद्दल त्याला कांहींच वाटत नाहीं. उलट माझ्याशीं विरोध करायला तो प्रत्येक प्रसंगाची जणूं काय आतुरतेनें वाट पहात असतो. आणि तशी संधि आली,

कीं माझ्यावर टीका करण्यास तो कधींहि चुकत नाहीं. आपल्याबद्दल त्याच्या मनांत आदर अगर आपुलकी उत्पन्न झाली नाहीं. आपण त्याच्यासाठीं एवढं करतों पण तो कुठें माझी पर्वा करतो? त्यानें माझ्या मनांतील दुःख पाहूं नये आणि मी मात्र त्याला आनंद देण्यासाठीं शक्य तों झटावं! कां म्हणून? पुरुषांच्या अरेरावीपणाचा हाहि एक नमुना नव्हे काय?' ती स्वतःशींच विचार करत होती.

फिरून आल्यानंतर तिनें आपल्या मनाशीं पक्का निर्धार केला, कीं अरविन्दाशीं आपण मैत्री ठेवूं नये-नव्हे पुरुषांची मैत्री न करणं बरं! अरविन्द काय अन् दुसरे पुरुष काय, सारे सारखेच!

असा विचार करतांच तिला थोडं बरं वाटलं. आजपर्यंत तिनं कुणाविषयीं काळजी केली असेल, कुणाविषयीं तिला आपलेपणा वाटत असेल, कुणाविषयीं प्रेमाची भावना उत्पन्न झाली असेल तर ती एकट्या अरविन्दाविषयींच. आतांपर्यंत तिनें एकट्या अरविन्दाशींच मैत्री केली होती आणि तो पुरुष असूनसुद्धां.

आणि आज तिनें त्या मैत्रीला कायमचं विसरण्याचा निश्चय केला. परीक्षेपर्यंतच्या पुढील चारपांच महिन्यांत ती त्याच्याशीं फारच थोडी बोलली. एकदां अरविन्दानें तिच्याजवळ बोलतांना साहाजिकच एकमेकांच्या लग्नाचा विषय काढला होता, पण वत्सलेनें त्याची ती सूचना केव्हांच धुडकावून लाविली आणि स्वतंत्रपणें रहाण्याचा आपला निश्चय कायम केला. सारे पुरुष तिला आतां कमीपणाचे वाटूं लागले. अरविन्दसुद्धां!

बी. ए. ची परीक्षा संपली. आणि अरविन्दाचा नागपूरास आपल्या गांवीं जाण्याचा दिवस नक्की झाला. वत्सलेच्या वर्तणुकींत पडलेल्या फरकाबद्दल त्याला फारच वाईट वाटलें. त्याला पूर्ण आशा होती, कीं कांहीं झालं तरी वत्सला आपणास विसरणार नाहीं, इतर पुरुषांबरोबर तुसडेपणानें जरी ती वागली तरी आपल्याविषयीं तिच्या हृदयात आपुलकीचीच भावना आहे. आपल्या सहवासांत ती आतांपर्यंत आनंद मानीत होती आणि पुढं ती आपलीच होणार.

पण त्याचे सारे बेत तिथेंच जिरले. त्याला आपल्या स्वतःबद्दल

वाईट वाटलं नाहीं. त्याला खात्री होती कीं हीच वत्सला एक दिवस आपल्यापाशीं लग्नाची याचना करण्याकरितां येईल. पण केव्हां ? पश्चात्तापानंतर ! तिला जगाची जाणीव झाली पाहिजे. स्त्रीस्वातंत्र्याच्या कल्पना किती मर्यादित स्वरूपाच्या असतात हें तिला समजलं पाहिजे आणि तिच्या नसनसांतून ओथंबणारा तिच्या स्वतःच्या अनुपम सौंदर्याचा, शिक्षणाचा अन् व्यवहाराचा अहंकार पूर्णपणें नाहींसा झाला पाहिजे.

नागपूरला निघण्याच्या आदल्या दिवशींच तो वत्सलेला भेटण्यास तिच्या घरीं गेला. तिला भेटणं हें आपलं कर्तव्य आहे असं त्यांस वाटलं.

खोलींत वत्सला त्यावेळीं कांहींतरी वाचीत होती. दरवाज्यांत उभा असलेल्या अरविन्दास पहातांच तिला आश्चर्य वाटलं. आणि अरविन्द आपणहून स्वतः आपणास भेटण्यास आपल्या घरीं आला हें पाहून स्वातंत्र्याच्या स्वाभाविक भावनेनें तिला आनंद झाला.

" यावं काय ? " त्यानें दाराबाहेरून विचारलं.

" हो हो हो ! या ना ! " तिनें खुर्चीवर बसूनच उत्तर दिलें. स्वागत करण्यासाठीं ती उठलीही नाहीं. अहंकाराचा झणकारा अद्यापहि तिच्या अंगांतून गेला नव्हता.

अरविन्द आंत येऊन खुर्चीवर बसला.

" कां आलांत ? "

" येऊं नये ? " त्यानें शांतपणें विचारलें.

" असं नाहीं म्हटलं मी ! पण पुष्कळ दिवसांनीं आला म्हणून मला किंचित् आश्चर्य वाटलं ! "

" असं ! "

" सांगा ना, कां आलां ? " तिनं पुन्हां विचारलं.

" उद्यां मी नागपूरला जाणार, एवढं सांगावं अन् तुमचा निरोप घ्यावा म्हणून आलों. "

" बरं आहे ! तुमचा नागपूरचा पत्ता माझ्याजवळ आहेच. तशी जरूर लागल्यास कळवीनच ! " आणि तिनं आपलं वाचन चालू केलें.

अरविन्दास आश्चर्याचा धक्काच बसला. आतांपर्यंत कुठल्याहि

पुरुषाबद्दल नसला तरी आपल्याबद्दल वत्सलेच्या मनांत थोडाफार आदर वसत होता हें त्याला माहित होतं. तिचं आपल्यावर प्रेम आहे हेंहि तो जाणून होता. कधीं कधीं तिच्या हेकेखोरपणानें तिचं वर्तन बेपरवाईचें होई पण त्याबद्दल त्याला फारसं वाईट वाटत नसे. लवकरच तिला आपल्या असहाय्यतेची जाणीव होईल याची त्याला पूर्ण खात्री होती. आणि या कारणासाठीं तो गप्प होता.

यावेळीं मात्र तिचं बेपर्वाईचें वर्तन त्यास सहन झालं नाही. त्याला तिचा रागहि आला. तो लगेच खुर्चीवरून उठला आणि तिच्याकडे न पहातांच निघून गेला.

तो बाहेर पडून दरवाजा लावतांच आवाज झाला. चटकन् वत्सला भानावर आली. तिनं आजूबाजूला पाहिलें. अरविंद तिथं नव्हता. ती धांवतच दरवाज्याकडे गेली आणि तिनें मोठ्यानें हांक मारली, "अरविंद!"

तिचे शब्द हवेंतच विरले.

चार महिन्यानंतरची गोष्ट. अरविन्द नागपूरासच होता. त्यानें वत्सलेस एक पत्रहि पाठविलें नव्हते. तिनंहि त्याची चौकशी केली नव्हती. स्त्रीस्वातंत्र्याच्या विचारांतच ती नेहमीं गर्क असे.

त्यादिवशीं तिची कॉलेजमधील मैत्रिण कमल कुलकर्णी आजारी आहे असं कळल्यावरून तिला भेटण्यासाठीं वत्सला तिकडे गेली.

खोलींत शिरतांच मोठ्या आनंदानं कमलनें तिचं स्वागत केलं. बिछान्यांतच पडून होती ती. पण फार आनंद झाला तिला वत्सला आलेली पाहून. कमलनें तिची आपल्या नवऱ्याशीं आणि छोट्या अशोकशीं ओळख करून दिली.

"ही माझी मैत्रिण वत्सला हं!" तिनं आनंदरावांकडे पाहून म्हटलं. त्यांनीं हांसत तिला नमस्कार केला, "आणि बाळ अशोक, ह्या वत्छूमावशी हं!" बाळ अशोक तिच्याकडे निरखून पहात होता.

"बाळ येतोस तूं?" आणि आनंदरावांच्या मांडीवर बसलेल्या बाळ अशोकला घेण्यासाठीं वत्सलेनें आपले हात पुढें केले.

मोठ्या आनंदानें बाळ अशोक तिच्याकडे गेला. कांहीं मुलांचा

स्वभावच असतो तसा. कितीदांतरी वत्सलेनें मोठ्या प्रेमानें बाळ अशोकचे मुके घेतले, स्त्रीसुलभ वत्सलता आज तिच्यांत उत्पन्न झाली होती. स्त्रीसुलभ भावनेला आज तिनें पहिल्यादांच कवटाळलें होतें. आपल्या हातांत आनंदसागरच आला असं तिला क्षणभर वाटलं. तिनं आनंदरावांकडे हळूच पाहिलें. किती प्रेमानं आणि आनंदानें आनंदराव कमलशीं बोलत होते! तिच्या आजारीपणामुळें त्यांना किती वेदना होत आहेत. तिला खूष करण्यासाठीं, आनंद देण्यासाठीं ते किती धडपडतात! या साऱ्या गोष्टींचें वत्सलेनें तेथें असलेल्या मुदतींत सूक्ष्म रीतीनें निरीक्षण केलें. वेळ होतांच ती घरीं येण्यास निघाली.

" वछुमावशी, आतां पलत केवां येनाल ? " डोळ्यांची उघडझांप करीत मान वर करून अशोकनें विचारलें.

" उद्यां येईन हं ! पण अगोदर मला एक पापा दे ! " आणि असं म्हणतांच बाळ अशोकनें तिला एक गोड पापा दिला.

खोलींतून बाहेर पडत असतांना तिनं एक खोल उसासा टाकला. बाळ अशोक अचलित नेत्रांनीं तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात होता.

त्याच्या दुसऱ्या दिवशींची गोष्ट. चौपाटीवर ती संध्याकाळीं फिरावयास गेली होती. दोनचार फेऱ्या मारून ती टिळकांच्या पुतळ्याजवळ येऊन बसली.

जवळच एक लहान मूल खेळत होतें. आकाशांत पौर्णिमेचा चंद्र उगवत होता.

बाळानें उगवत्या चंद्राकडे पाहिलें. तो धांवतच गेला आपल्या आईकडे. तिच्या गळ्यास प्रेमानें मिठी मारली आणि विचारलं, " आई, तो कोण ग ? "

" चांदोबाबाप्पा आहे बाळ तो ! तुला काल ‘ चांदोबा चांदोबा, टोपी दे !’ हें गाणं शिकवलं नव्हतं का ? तोच चांदोबा हा. "

" मग टोपी देण्यास खालीं ग कसा नाहीं येत तो ? "

" बाळ घर सोडून, आपल्या आईस सोडून कसा येईल तो ? "

“ आई कुठं ग आहे घर त्याचं ?”

“ वर आकाशांत !”

“ आणि त्याची आई कुठं ग आहे ?”

“ ती त्याच्या जवळच असते नेहमीं ! तिलाच आपण पृथ्वी म्हणतो !”

“ कित्ती चांगला दिसतो आहे चांदोबा ! नाहीं ग आई ?” आणि त्यानें आईच्या गळयास पुन्हां घट्ट मिठी मारली.

“ तूं नाहीं का चांगला ! किती चांगला आहे माझा बाळ ?” आणि तिनें वत्सलतेनें त्या बाळाचे किती तरी मुके घेतले.

वत्सलेला तें दृश्य पाहवेना. तिच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. तिनें आपली मान फिरविली. आदल्याच दिवशीं कमलच्या घरीं पाहिलेल्या गोष्टी, कमलचं तिच्या पतिबरोबर चाललेलं भाषण, तिचं त्याच्याशीं वागणं, बाळ अशोकचा आई–वडिलांबरोबर चाललेला खेळ, त्याच्या गोष्टी तिला आवडल्या. किती प्रेमानें आपण बाळ अशोकचे आदल्या दिवशीं मुके घेतले ! आणि वत्सलतेचें दुसरं दृश्य आज ती पहात होती. ‘ आपल्या नशीबीं असलं दृश्य असेल काय ?’ तिच्या मनांत झटकन् विचार येऊन गेला. त्याच विचारांत ती जड अंतःकरणानें घरीं परतली.

आणि दुसऱ्याच दिवशीं तिनें नागपूरास अरविन्दच्या नांवें पत्र पाठविलें.

रणदिवे–निवास, मुंबई.

प्रिय अरविन्द,

जरूर वाटली म्हणूनच पत्र पाठवित आहे. रात्रीच्या गाडीनें तिकडे येत आहे. विशेष खुलासा भेटीअंतीं.

तुमची

—वत्सला.

आणि अठराव्या दिवशींच नागपूरच्या वर्तमानपत्रांत खालील बातमी ठळक अक्षरांत प्रसिद्ध झाली—

अभिनंदनीय विवाहः—मुंबईच्या सुप्रसिद्ध समाजकार्यकर्त्या आणि स्त्री-स्वातंत्र्याच्या कट्टया पुरस्कर्त्या व कैवारी कुमारी वत्सला दिक्षित यांचा विवाह नागपूरचे सुप्रसिद्ध वकील अप्पासाहेब जोशी यांचे चिरंजीव अरविंद यांच्याशीं आजरोजीं रजिस्टर पद्धतीनें झाला!

वत्सलेच्या परिचयाच्या सर्व वाचकांनीं आश्चर्यानें तोंडांत बोटं घातलीं ती बातमी वाचून.

आशा—प्रमोद २९।१०।१९३९.

---

# ७ : : स्मशानभूमींत

त्या दिवशीं आमच्या मिशनरी शाळेचे प्रिन्सीपॉल मिस्टर टेलर यांची प्रेमळ पत्नी खिस्तवासी झाली.

आणि तिला मूठमाती देण्यासाठीं आम्हीं पुष्कळसे तिचे आवडते विद्यार्थी खिस्ती लोकांच्या सिमेटरींत जमलेले होतों.

खिस्तवासी मिसेस टेलर हीहि आमच्या शाळेंत टीचर होती.

जनरल इंग्लिश घेत असे ती. स्वभावानें फारच ममताळू आणि तशीच प्रेमळ.

एकसारखा फार वेळ निरनिराळ्या विषयांचा अभ्यास करून कंटाळा आला आणि त्यानंतर तिचा जनरल इंग्लिशचा आमच्या वर्गावर तास असला कीं केव्हां केव्हां आम्ही तिला म्हणत असूं, "मॅडम्, आतां आपण खेळूं या! फारच कंटाळा आला आहे सकाळपासून अभ्यास करून!"

ती आमच्याकडे पाहून हांसे. किती मोहक हास्य असें तिचें तें. दोन्ही ओठांना किंचित् मुरड घालून आणि ओठांचीं दोन्ही बाजूची टोंकं किंचित् विस्तृत करून ती स्मितहास्य करी त्यावेळीं तिच्याकडे पहाणाऱ्यास फारच गंमत वाटे.

ती किंचित् विचार केल्यासारखं दाखवी, उगीचच् थोडे आढेओढे घेई आणि आमचं म्हणणं आपल्याला आतां पटलं असं भासवून ती म्हणे, ‘ ऑल राईट ! लेट्स् प्ले वुईथ् वर्ड्स ! ’

आणि असं तिनें म्हणतांच आम्हीं सारे मोठ्या आनंदानें निरनिराळे इंग्रजी शब्द, त्यांची अक्षररचना वगैरेबद्दल एकमेकांना प्रश्न विचारून गंमतीनें खेळत असूं ! तीहि मधूनमधून आमच्या खेळांत भाग घेऊन आम्हांस मदत करीत असे. एकप्रकारचा अभ्यास होत असे तो आमचा.

शाळेंत सुरू झालेल्या बालवीरांच्या चळवळींतसुद्धां तिनें प्रामुख्यानें भाग घेतला होता.

एकादा शाळेंतील विद्यार्थी आजारी पडला आणि तिला त्याबद्दल समजलें तर ती जातीनें त्याच्या घरीं जाऊन त्याच्या सिकपणाबद्दल मोठ्या आस्थेनें विचारपूस करी; आणि तसाच गरीब विद्यार्थी असल्यास त्यास थोडीफार आर्थिक मदत करण्यासही ती कचरत नसे. साऱ्या गांवांत लोकांच्या मनांत तिच्याविषयीं आदर होता.

पण ती प्रेमळ, परोपकारी अन् मनमिळाऊ बाई मात्र आमच्यांतून निघून गेली होती.

काळाचा निष्ठूर कणखर हात आज तिच्यावर पडला होता.

आणि तिच्या त्या मृत देहाला पण शांत न् अमर आत्म्याला साश्रु नयनांनीं शेवटचा निरोप देण्यासाठीं आज त्या सिमेटरींत आम्ही सारे लोक जमलेले होतों.

साऱ्या विद्यार्थ्यांनीं, आप्तेष्टांनीं आणि मित्रमंडळीनीं तिच्या ‘कॉफीन्’ला अत्यंत आदरानें न् प्रेमानें हात लावून खालीं खड्यांत सोडलें.

दुखित अंतःकरणानें व डबडबलेल्या साश्रुनयनांनीं मिस्टर टेलरनीं तिला मूठमाती दिली. मोठ्या शिकस्तीनें अद्यापपर्यंत आंत दाबून ठेवलेला दुःखाचा हुंदका नकळत त्यांच्या तोंडावाटें बाहेर आला. त्यांनीं चटकन् दुसरीकडे तोंड फिरविलें आणि खिशांतील रुमालानें अश्रू पुसले.

मनोभावनेनें आम्ही सर्वांनीं तिच्या ‘ कॉफीन् ’ वर फुलें वाहिलीं. धर्मोपदेशकानें प्रार्थना केली.

आणि आम्ही परतलों.

थोडं चाललों नाहीं तोंच आम्हांस एक अत्यंत दरिद्री, जीर्ण वस्त्रें अंगावर असलेला वृद्ध इसम भेटला.

त्याचें शरीर फारच कृश होतं. अंगावर मुळींच मांस नसल्यामुळें सारीं हाडं बाहेर आलेलीं दिसत होतीं. दाढी फार वाढल्यामुळें आणि केंसांच्या जटा झाल्यामुळें चेहरा फारच विद्रूप दिसत होता. दारूची घाण त्याच्या तोंडास येतच होती.

' जोसेफचं थडगं कुठं आहे ? ' त्यानें विचारलं.

' कां ? ' आम्ही सर्वांनीं आश्चर्यानें विचारल. कारण जोसेफ मरून आज आठदहा वर्षें झालीं होतीं. सुप्रसिद्ध नट, नाटककार आणि लेखक होता तो एक.

पण तसाच छंदी, व्यसनी न् दारुडा.

आमच्या मनांत जिज्ञासा उत्पन्न झाली. म्हणून त्यास आम्ही जोसेफचें थडगं दाखविलें.

फार वर्षें झाल्यामुळें तें जुनाट दिसत होतें. बुरसट झाल्यामुळें जागोजागीं त्याच्यावर शेवाळ्यासारखीं लहान लहान रोपटंही उगवलेलीं होतीं.

" कशाला पाहिजे विचारलंत ? सांगतों सारं ! " तो वृद्ध दरिद्री जोसेफच्या थडग्याकडे पहात म्हणाला.

आणि त्यानें आपली व जोसेफची हकीकत सांगायला सुरवात केली. शान्त चित्तानें आम्ही ऐकत होतों:—

" फार वर्षें झालीं त्याला. सुप्रसिद्ध नट अन् नाटककार म्हणून साऱ्या लोकांना माहीत होता तो. एकदांच त्याच्या नाटकाला गेलों होतों मी. त्या नाटकांत त्यानें स्वतः भूमिका केली होती. आपल्या नाटकांतील भूमिकेमुळें त्यानें माझ्या मनाला त्यावेळीं जोराचा धक्का दिला. नाटक पहात असतांनाच मनांत मी निश्चय केला, ' आपण नट् व्हायचं ! ' दुसऱ्या दिवशींच त्याची भेट घेतली मी. माझी सारी हकीकत त्याला मी सांगितली आणि नट होण्याची त्याच्याजवळ इच्छाही प्रगट केली. त्यानें मला अभिनय शिकविण्याबद्दल आश्वासनही दिलें. त्या दिवसापासून

त्याचा मी छंदच धरला. दररोज त्याच्या घरीं मी जाई आणि तो कामांत असल्यास आतां थोड्या वेळानें कामांतून मोकळा होण्याची वाट पहात सारा दिवस त्याच्या घरीं काढी. शेवटीं कंटाळून निराशेनें मी घरीं परतत असें."

"आज बारा वर्षांनीं मी इथं येत आहें. काय मिळवलं मी? त्याचा छंद न् दारिद्य. आईवडिलांचें ऐकलं नाहीं, त्यांचा अपमान केला, आणि बायकोपोरांना उपाशी ठेवून भिक्षेस लाविलें. रात्रंदिवस एकच छंद धरला—'मी नट होणार! जोसेफ मला नट करणार!' तहान-भूक विसरलों, प्रकृतीची आबाळ केली, मिळवलेला पैसा गमावला आणि शेवटीं दारिद्र्याची करवंटी हातीं घेऊन दारुडा बनलों. कुणापायीं?"

"डॉक्टरनीं सांगितलं,—'मरणार मी लवकरच!' जगून तरी काय करायचं? मनाची खात्री होत होती. दिवसेंदिवस प्रकृती खालावत चालली. दारूचं व्यसन वाढतच होतं. दारूतर पाहिजे होती. हातांत पैसा नाहीं. मग काय करणार? सारे लोक अशा परिस्थितींत काय कर-तात? तेच मी केलं. स्वतःला चोरीचं व्यसन लावून घेतलं. चोऱ्या करूं लागलों. माझ्या मनांतल्या मनांत मी चोर ठरलों."

"व्यसन, दारू न् चोरी! तिन्ही अवस्थांत मी पूर्णपणें गुरफटून गेलों. मरण दाराशीं आलं होतं."

आणि तो!

"जोसेफ! पुष्कळ विनवणी केली मी त्याची पण व्यर्थ. अभिनयाचें एकही अंग त्यानें मला शिकवलें नाहीं. माझेजवळचे सारे पैसे मात्र त्यानें खलास केले आणि ही माझी दुर्दशा केली."

मी म्हणतों, "बदमाषच होता तो!"

कां म्हणूं नये त्याला बदमाष!

कशामुळें माझी ही दारुणास्थिति झाली? कुणापायीं?

विचार केला न् इथं आलों.

कशासाठीं विचाराल?

निदान शान्तपणें झोप घेत असलेल्या त्याच्या थडग्यांतील आत्म्यास चार शब्द सांगावेत. त्याला खडबडून जागं करावं. तेवढंच माझ्या मनाला समाधान वाटेल.

त्याच्या मागें त्यानें एका मानवाची माणूसकी सोडून दुर्दशा केली होती.

इथंच त्याच्या थडग्याजवळ आतां मी मरणार आहें!

झाली माझी हकीकत! सांगा आतां–माझ्या दुर्दशेला कारण कोण?– मी कीं तो बदमाष जोसेफ?"

आपण त्याला सारे लोक सुप्रसिद्ध नट, नाटककार नी लेखक म्हणतों. पण तोहि व्यसनी होता, दारुड्या होता.

"आणि माझ्या मतें एक नंबरचा बदमाष होता."

त्यानें जोसेफच्या थडग्यासमोर गुढघे टेकले, हात जोडले आणि डोळे मिटून तोंडांतल्या तोंडात तो कांहींतरी पुटपुटला.

"इथंच मरणार असं दिसतं!" आमच्यापैकीं कुणीतरी म्हणाला.

"खरं आहे!" मी म्हणालों. सर्वांनीं मागं वळून त्याच्याकडे पाहिलें आणि आम्ही घरीं येण्यास निघालों.

सिमेटरीच्या दरवाज्यांतून दुसरी कुणाची तरी कॉफीन् आंत येत होती.

चौकशी करतां समजलं–गांवांतील निरुपद्रवी भिक्षेकरी होता तो एक.

साहजिकच सर्वांची नजर त्या कॉफीन्कडे गेली.

आम्हीं तेथें असलेल्या थोडक्या मुदतींत तिसरी कॉफीन् होती ती. आणि चवथी जोसेफच्या थडग्याजवळ पहांटेपूर्वी तयार होणार होती.

"असं असतं या जगांतील आपलं जिणं! लहानथोर, गरीबश्रीमंत, दुर्जनसज्जन, स्त्रीपुरुष सारे जीव एक होतात इथं या स्मशानभूमींत!

सारे भेदभाव विसरले जातात एकच. भाव तिथं खेळत असतो––

––आपुलकी! आणि एकच जात तिथं समजली जाते––माणुसकी! मी मनांत पुटपुटलों.

सारी मंडळी खालीं माना घालून शांत चित्तानें सिमेटरीच्या बाहेर येत होती.

( चेकाव्हच्या " At the Cemetary " या रशिअन गोष्टीवरून )

[ या गोष्टींतील मध्यवर्ती कल्पनेवर आधारलेली प्रस्तुत लेखकाची ' स्मशानभूमींत ' याच नांवाची सामाजिक कादंबरी लवकरच प्रसिद्ध होईल. ]

—अप्रकाशित

———

# ८ : : प्रतारणा

मी माझ्या स्वत:बद्दल विचार केला कीं मला मोठं आश्चर्य वाटे. आणि जों जों मी त्याविषयीं जास्त विचार करूं लागे तों तों माझे विचार साऱ्याच लोकांबद्दल तशा प्रकारचे बनत.

नाहींतर तसं पाहिलं असतां मी कुठचा न् हेनी कुठची !

पण त्या दिवशीं तिची माझी अचानक गांठ पडली. योगायोगानें ओळख झाली आणि ओळखीचं रूपांतर स्वाभाविकपणें प्रेमांत होत गेलं.

आणि त्या दिवसापासून मला तिच्याशिवाय दुसरं कांहीं एक सुचेना.

सारा मनुष्यप्राणी माझ्याप्रमाणंच वागत नाहीं का !

का आपण उगाच एकाच माणसावर प्रेम करतों ? कशाला आपल्या डोक्यांत एकाच व्यक्तीबद्दल विचार चाललेले असतात ? मला मोठं नवल वाटे.

ती !

आपलं प्रेम !

नी आपले विचार !

एकप्रकारचा त्रिकोणच नाहीं का हा ?

आपल्या हृदयांत एकाच व्यक्तीबद्दल आंदोलनं मिळत असतात !स्त्रीबद्दल.

नजरेपुढं एकच चित्र सदा उभं राहतं !—तिचं ! आणि जीवनांत एकाच गोष्टीसाठीं मनुष्याची धडपड चाललेली असते !—तिच्यासाठीं !

‘ कां बरं माणसानं असं एकाच व्यक्तीबद्दल–स्त्रीबद्दल प्रेम दाखवावं ? ’ मला आश्चर्य वाटे. पण माझ्याहि बाबतींत तसंच घडलेलं होतं.

लग्न होण्याच्या पूर्वीपासूनच हेनी माझी सुखसर्वस्व होती.

आणि लग्न झाल्यानंतर या भूतलावर माझी अशी एकच वस्तू मला दिसली–हेनी ! ’

ऑफिसांत गेलों तरी काम करतांना माझ्या नजरेसमोर हेनीची सुकुमार मूर्ती उभी राही. कागदाच्या समरभूमीवर आंकड्यांचं महायुद्ध चालू असतांना हा लेखणीबहाद्दर लेखणी आडवी तोंडांत धरून कित्येकदां हेनीबद्दलच विचार करीत बसे.

आणि ऑफिसचा वेळ होतांच कुणाचीही वाट न पहातां मी घरचा मार्ग सुधारत असे.

दरवाज्यांत माझ्या स्वागतार्थ हंसऱ्या चेहऱ्यानें उभ्या राहिलेल्या माझ्या हेनीला पाहून मला कितीतरी आनंद होई. दुसऱ्या दिवशीं ऑफिसांत जाईपर्यंत तिच्या मिळणाऱ्या सहवासांत मी साऱ्या जगाला विसरत असे.

कधींतरी शनिवार, रविवार अगर सुट्टीच्या दिवशीं तिच्या मनांतून सिनेमाला जायचं असलं कीं ती मला म्हणत असे ‘ डेव्हीड, आज किती सुंदर पिक्चर लागलं आहे ! जाऊं या ना आपण ? ’

“ कशाला आज ! जाऊं उद्यां ! हं ? ” मी मुद्दामच म्हणत असें.

“ नाहीं ! ” मोठ्या गमतीनें ती हेल काढून म्हणे. “ उद्यां नको ! आजच जाऊं या आपण ! ” आणि किती तन्मयतेनें न् कौशल्यानें ती आपल्या मानेस एक प्रकारचा सुंदरसा वळसा देई. मला मोठी गंमत वाटे तिला तशा स्थितींत पहाण्याची.

आणि नंतर साहाजिकच आम्ही मोठ्या आनंदानें सिनेमाला जात असूं.

त्या दिवशीं मात्र मी ऑफिसांतून आल्यावर मला माझी हेनी दर-वाज्यांत दिसली नाहीं. दाराला कुलूपच होतं. मला वाईट वाटलं.

विमनस्क स्थितींत मी दाराचं कुलूप काढलं आणि आंत शिरलों.

टेबलावरच एक लहानशी चिठ्ठी ठेविली होती, ती पाहतांच मला आठवण झाली कीं माझी हेलेन कुणाला तरी भेटायला त्या दिवशीं जायची होती. तसं तिनं मला सकाळींच ऑफिसांत जातांना सांगितलं होतं.

मी चहा करून घेतला आणि कसलंतरी गोष्टीचं पुस्तक वाचीत हेनीची वाट पहात बसलों.

गार वारा वहात होता बाहेर ! आकाशांत ढगांची गर्दी होत होती. पावसाळीं दिवस होते ते ? मीं खिडकींतून सहज आकाशाकडे पाहिलें.

अक्राळविक्राळ रूप धारण केलेले मेघरूपीं राक्षस एकमेकांच्या अंगा-वर सारखे तुटून पडत होते. लहानांचा त्या चुरशींत चुराडा होत होता.

लवकरच जलधारा पडण्यास सुरवात झाली. खिडकींतून पाणी आंत येऊ नये म्हणून मी खिडकीचे दरवाजे लावले व काळोख पडल्यामुळें दिवा पेटविण्यासाठीं स्विचचें बटण दाबलें.

लख्ख उजेड पडला खोलींत !

आणि त्या दिव्य प्रकाशांत समोरच्या भिंतीवर खुंटीला अडकवलेली हेनीची छत्री माझ्या नजरेस पडली.

माझं मन किंचित् घाबरलं.

“ वाटेंत पावसानं तिला गाठलं तर नसेल ना ? ” माझ्या मनांत शंका आली.

“ आणि गांठलं असलं तर बिचारी चिंब भिजून येईल घरीं ! ”

बावरलेल्या स्थितींत मी दिवाणखान्यांत इकडून तिकडे फेऱ्या घालूं लागलों.

बाहेर धों धों पाऊस पडतच होता.

आठच्या सुमारास हेनी घरीं आली. सारं अंग भिजून गेलं होतं तिचं पावसानं. थंडीनं गारठून गेली होती बिचारी.

माझ्याशीं न बोलतांच तिनं घाईघाईनं आपले अंगावरील भिजलेले कपडे बदलले आणि बिछान्यावर धाडकन् अंग टाकून गरम ब्लँकेट अंगा-भोंवतीं लपेटून घेतला.

त्या रात्रींच तिच्या अंगांत ताप भरला.

मला वाईट वाटलं ! भीतीही वाटली.

आणि उत्तम प्रकारें शुश्रुषा करीत असतांनासुद्धां चवथ्या कीं पांचव्या दिवशीं, मानवी प्रयत्न निष्फळ होऊन माझी हेनी ख्रिस्तवासी झाली.

ती मरण पावली त्या रात्रीचीच गोष्ट. तिनं मला जवळ बोलावलं. माझे दोन्ही हात मोठ्या प्रेमानं आपल्या हातांत घेतले आणि आपला उजवा हात हळुवारपणें त्यावर फिरवीत मला हांक मारली, ' डेव्हिड ' !

मी तिच्याकडे पहातच होतों, तिची हांक ऐकून माझं मन एकदम कचरलं.

मला बोलतां येईना. डोळ्यांतून वाहणाऱ्या अश्रूंनीं तें काम केलें.

त्याच स्थितींत मी प्रेमभरानें तिच्या केसांवरून हात फिरवीत होतों.

दोन मिनिटं त्याच स्थितींत गेलीं. विचार केला. तिला कांहींतरी सांगायचं असेल, म्हणून तिनं मला हांक मारली असावी. मी किंचित् खालीं वांकलों अन् म्हटलं, " काय पाहिजे हेनी तुला ? "

" डेव्हीड ! डेव्हीड ! रागवणार नाहीं ना मी...मी...! " पुढचे शब्द तोंडांतल्यातोंडांतच राहिले. तिनं आपल्या डोळ्यांची क्षणभर उघडझाप केली आणि माझ्याकडे क्षणभरच पाहिलें.

"हेनी ! मी न् तुझ्यावर रागवेन ! कां ! काय सांगायचंय तुला !"

श्वास मंदगतीनें चालला होता. आवाज फारच क्षीण होत होता ! चेहऱ्यावर बदलते रंग उमटले होते.

" डेव्हीड ! " तिनं पुन्हां हांक मारली.

पण ती हांक देखील अर्धवटच राहिली.

माझी हेनी त्याच क्षणाला मला न सांगतांच या जगांतून निघून गेली होती !

धर्मोपदेशक पुढं झाला न् प्रार्थनेस सुरवात केली.

निःशब्द वातावरणांत मी साश्रुनयनांनीं हेनीच्या मृत देहाकडे पहात प्रार्थना करीत होतों.

हेनीच्या प्रेताला मूठमाती देऊन सिमेटरीमधून परतलों तो बावरलेल्या मनःस्थितींतच! सारं घर मला उदास न् भयाण वाटूं लागलं. त्या घरांत मला राहवेना. विश्रांतीसाठीं बाहेर कुठंतरी जावं असं वाटूं लागलं.

मित्रांच्या सल्ल्यावरून आणि मलाहि जरूरी भासली म्हणून दोन महिन्यांची मी रजा घेतली आणि तिसऱ्या दिवशींच प्रवासास निघालों.

दोन महिन्यांत कितीतरी ठिकाणीं भटकलों. निरनिराळे प्रदेश, लोक, नानातऱ्हेच्या इमारती सुंदर सुंदर देखावे सारं मी पाहिलं. पण माझ्या हेनीचा मला विसर पडेना. एक क्षण जरी मन दुसरीकडे गुंतलेलं नसलं कीं मला तिची आठवण होई.

कुठलीही सुंदर वस्तू दिसली, एकादं सुंदर निसर्गस्थळ पाहिलं कीं मला वाटे, " यावेळीं माझी हेनी जर माझ्याबरोबर असती तर किती चांगलं झालं असतं! "

मन हेनीसाठीं बेचैन झालं होतं.

रजा संपतांच मी गांवीं परतलों. ऑफिसमध्यें जायच्या आधीं एक दिवस आलो होतों मी! तो सारा दिवस मी बाहेरच भटकण्यांत घालविला. जेवण, चहा सारं कांहीं बाहेरच्या हॉटेलांतच घेतलं. आणि झोंपण्यासाठीं संध्याकाळीं घरीं आलों.

सारं पुन्हां उदास दिसूं लागलं. नानाप्रकारचे विचार माझ्या मनांत येऊं लागले. सारं गतायुष्य माझ्या नजरेसमोर उभं राहिलं. हेनीची प्रेमळ मूर्ती माझ्या दृष्टीसमोर दिसूं लागली.

वाचण्याचा प्रयत्न केला. पण लक्ष लागेना. झोंपण्यासाठीं डोळे मिटून बिछान्यावर पडलों. पण झोंप येईना.

तिच्या विचारानें वेडा झालों.

आणि त्या वेड्या लहरींत घर तसंच उघडं टाकून भटकत भटकत सिमेटरींत आलों.

पौर्णिमेची रात्र होती ती.

सगळीकडे लख्ख चांदणं पडलं होतं. झाडांच्या चंदेरी कडा त्या चंद्र-प्रकाशांत चमकत होत्या.

वायुलहरींचं मंदगतीनं अंतरिक्षांत नृत्य चाललं होतं.

आणि आकाशांत तारानाथ चांदण्यासंगें स्वैरपणें विहार करत होता.

सारा निसर्ग स्वर्गीय आंदोलनांत हांसत आहे असा मला भास झाला.

आणि त्या गोड संवेदनेंतच मला माझ्या हेनीची आठवण झाली.

चटकन् माझं लक्ष तिच्या थडग्याकडे गेलं.

तिच्या थडग्यासमोर कुणीतरी व्यक्ती पाठमोरी बसलेली मला चांद-ण्यांत दिसली.

मी निरखून पाहिलं! हात जोडून प्रार्थना करीत असावी ती असं मला वाटलं.

कोण आहे म्हणून पहाण्यासाठीं मी तिकडे चालूं लागलों. मी अर्ध्या वाटेवर जाण्यापूर्वींच तो इसम उठून निघून गेला.

मी पुढं गेलों न् तिच्या थडग्यासमोर उभा राहिलों. डोळे पाण्यानं डबडबलेले होते.

मातीशीं एकजीव झालेल्या माझ्या हेनीच्या मृत देहाला न्याहाळून पहावं म्हणून मी तिच्या स्मारकाकडे पाहिलें.

मनांत विचार. " हीच हेनी थोड्याच दिवसांपूर्वीं माझ्याशीं एकजीव झाली होती. "

आणि आतां!

जमिनींत पुरलेलीं माणसं मातीशींच एकजीव व्हायचीं. स्मारकांत अंतर्भूत झालेल्या हेनीच्या आत्म्यास विनम्रपणें वंदन करावं म्हणून हात जोडले आणि मान वांकवून प्रणाम केला.

तिच्या थडग्यावर कोरलेलीं अक्षरं माझ्या नजरेस पडलीं.

आणि खालींच पांचसहा फुलं उधळलीं होतीं. त्यावर इंग्रजींत लिहिलं होतं,—

" She loved, She was loved. She died "

मनाला वाटलं, "तिनंच आंतून कोरलेलं नसेल हें!" नाहींतर दुसरा कोण लिहिणार!

पण मग फुलं इथं कुणी आणलीं!

मी विचार केला! आजूबाजूला पाहिलं. पुन्हां तीं अक्षरं वाचूं लागलों.—

"She loved, She was loved, She—

झर्‌कन् मनास एक विलक्षण विचार चाटून गेला.

खरं असेल का हें!

त्या रात्रीं खात्रीनं ती आपल्या प्रियकराकडे गेली असावी. म्हणूनच निसर्गानं पावसाचा तडाखा सुरू करून तिला भिजत आणली असावी.

आणि माझ्याशीं—माझ्या प्रेमाशीं प्रतारणा केल्याबद्दल आजारी पडून मरण पावली.

खालीं पडलेलीं फुलं माझ्याकडे पाहून विकट हास्य करीत आहेतसं मला वाटलं.

मघांशीं चंद्रप्रकाशांत हेनीच्या स्मारकासमोर उभा राहून वंदन करीत असलेल्या त्या व्यक्तीचा मला भास झाला.

आणि नकळतच माझ्या तोंडांतून कोरलेल्या अक्षरांतील शेवटचे शब्द बाहेर पडले. And so she died.

( इंग्रजी गोष्टीच्या आधारें )

आशा-प्रमोद—२४।३।१९४०

# १ : : नलूची साडी

" ऐकलं का ? म्हटलं आज पगार होणार, आमच्या नलूसाठीं एक नवी साडी आणावी. फार इच्छा आहे तिची; शिवाय तिचा परकरही फाटला आहे." लक्ष्मीबाईनीं यजमान जेवणास बसल्यावेळीं सुरवात केली.

" अग, महिना कसा जातो याची काळजी लागते मला अन् म्हणे नलूसाठीं नवी साडी आणा. नेसेना ती परकर–पोलका. आतां मोठीच्च की झाली नाहीं ? "

" पण तिची फार इच्छा आहे ! "

" अग, इच्छा असली म्हणून काय झालं ? मलासुद्धां वाटतं एक नवीन गरम कोट शिवून घ्यावासा."

" काळजी ही आहेच ! एकदां मनुष्य संसारांत पडला कीं त्याच्यामागें ब्रह्मराक्षसासारखी काळजी ही लागलेलीच असते. पण ती आहे म्हणून इतर गोष्टीकडे दुर्लक्ष देऊन कसं चालेल ? तशांत आपली एकुलती एक लाडकी नलू—" लक्ष्मीबाईंचा कंठ दाटून आला...तिला पुढें बोलवेना; परंतु न बोलत्यें तर ही गोष्ट पुढील महिन्यावर जाणार या विचारानें तिनें कसंबसं तें वाक्य पुरें केलं.—" तिची एवढीही इच्छा नको का पुरी करायला ? "

'अग, मला सर्व कांहीं समजतं; पण उमगत नाहीं त्याला मी काय करूं ? आज पगार होणार ही गोष्ट खरी; पण–पण दाणेवाला कालच येऊन गेला; घरवाला दरदिवशीं हेलपाटे घालतोच आहे. दूधवाला उद्यां येईलच. आणखी–या सर्वांना सांवरतां सांवरतां माझा तोल कुठें जाईल, कांहीं सांगवत नाहीं; तशांत परवांचे दिवशीं साहेबांनीं माझ्या कपड्यांबद्दल माझी संभावना केलीच. याचा नको का विचार करायला ? आणि साडीची आतां इतकी कांहीं जरूरीही दिसत नाहीं.'

लक्ष्मीबाईंना फार वाईट वाटलें. साहेबांनीं कपड्यांविषयीं केलेल्या संभावनेचा विचार करायचा आणि आपली लाडकी एकुलती एक नलू इतके दिवस आपणास साडी पाहिजे म्हणून एकसारखी सांगते आहे याकडे दुर्लक्ष करायचं या रामभाऊंच्या स्वार्थीवृत्तीचा लक्ष्मीबाईंना राग आला. पण करणार काय बिचारी ! तरीपण तिच्या अपत्यवात्सल्यानें राहवेना. आणखी एकदां प्रयत्न करून पहावा म्हणून ती म्हणाली, "कपडे पुढच्या महिन्याला घेतले तर नाहीं का चालणार ?"

या वाक्यानें रामभाऊ फारच संतापले.

"म्हणे नाहीं का चालणार ? माझ्याबद्दल कांहींच तुला कसं वाटत नाहीं ? माझी नोकरी गेली म्हणजे मग तुला कळून येईल. नलू लाडकी असली म्हणून का तिची इच्छा आतांच पुरवायला पाहिजे ? पुढच्या महिन्याला पहातां येईल."

रामभाऊंच्या रागाचा पारा फार वर चढला. त्या रागांतच त्यांनीं कसेबसे दोन घांस खाल्ले व आपलें जेवण उरकलें.

तोंड वगैरे धुवून ते बाहेरच्या खोलींत आले आणि विश्रांतीसाठीं खालीं सतरंजीवर बसले.

"अण्णा ! अण्णा !" बाहेरूनच नलूची हांक आली.

"काय बाळ ?" नलूचा लाडका स्वर कानीं पडतांच त्यांचा राग थोडासा शांत झाला. पण मनांत एक शंका डोकावत होतीच.

"अण्णा !" आंत येतांच नलूनें सुरवात केली. "काल आई म्हणत होती कीं तुम्हांला आज पैसे मिळणार, मग आणणार ना माझ्यासाठीं

नवी साडी ? त्या शेजारच्या छबीनें बघा कशी आणली ती. मला पाहिजे नवी साडी ! " नलूनें लटक्या रागांतच आपले गाल फुगवले.

" तिचा बाप मिळवतो महिना पांचशें रुपये आणि तुझा मिळवतो पंचवीस छदाम ! " असे शब्द रामभाऊंच्या तोंडावाटें बाहेर पडणार होते; पण त्या निर्मल बालिकेच्या निष्पाप चेहऱ्याकडे पाहून, आणि आपली एकुलती एक लाडकी 'नलू' ह्या त्यांच्या पत्नीनें आतांच उच्चारलेल्या वाक्याची आठवण होऊन ते शब्द तोंडातल्या तोंडांतच राहिले; व रागही पुष्कळ शांत झाला.

" पुढच्या महिन्याला आणूं हं ! "

" पुढच्या महिन्याला नको. " नलूनें रागानें आपलें हात झटकले. ' असें तुम्ही अण्णा नेहमींच सांगतां. मागच्या वेळेस तुम्ही मला असेंच सांगितलें. '

नलूला वाईट वाटलें. तिच्या डोळयांत अश्रू चमकले पण तिला ते सांवरून धरतां येईनात. लहान बालिकाच ती.

" काय धरूं बाळ ? " खिन्न स्वरात रामभाऊ उद्गारले. त्यांना त्यांच्या परिस्थितीची जाणीव झाली. " आपल्याला पाच रुपयांची एक साडीसुद्धां आणतां येऊं नये ?—अन् ती तरी कुणासाठीं ?

—आपल्याच एकुलत्या एका लाडक्या नलूसाठीं आणि आज—आज मधु न् बाळ असते तर त्यांच्यासाठीं मी कपडे केले नसते का ? पण दैवाला ही गोष्ट पाहवली नाहीं; आणि त्यानें हें एकच लाडकें रत्न पाठीशीं ठेवलें— ह्या एका नलूची इच्छा मी नको का पुरवायला ? "

रामभाऊंचे विचार सुरू झाले. त्यांना फार वाईट वाटलें. डोळयांतून अश्रू सुरू झाले. नलूनें हें बघितलें तर तिलाही वाईट वाटेल, कदाचित् ती घाबरेल. या विचारानें रामभाऊंनीं आपलें तोंड फिरवलें व उठून ऑफीसांत जाण्यासाठीं कपडे घालण्यास सुरवात केली. आंतून आईची हांक आल्यामुळें नलू आंत गेली. तिला रामभाऊंच्या चित्तवृत्तीची कल्पनाही नव्हती.

रामभाऊ कुठल्याशा कंपनींत महिना चाळीस रुपयांवर कारकून होते. इंग्रजी पांच इयत्तेचे शिक्षण संपतांच रामभाऊंनीं शाळेला रामराम ठोकला आणि नोकरी करण्याच्या इच्छेनें ते मुंबईस आपल्या चुलत्याकडे येऊन राहिले आईबापांची गरिबी आणि त्यांत रामभाऊ त्यांचा एकुलता एक आशेचा जीव म्हणून त्यांना रामभाऊ मुंबईस जातेवेळीं फार वाईट वाटलें. पण आपला मुलगा मुंबईस नोकरीसाठीं जातो आहे, तेथें त्यालातरी नोकरी लवकरच मिळेल आणि आपले पुढील दिवस थोडेबहुत सुखासमाधानांत जातील या आशेनें त्यानीं रामभाऊंना मुंबईला जाण्यास परवानगी दिली. रामभाऊंच्या सुदैवानें त्यांना मुंबईस येतांच चारपांच महिन्यांच्या आंत वरील कंपनींत त्यांच्याच चुलत्याच्या ओळखीनें नोकरी लागली. आईबापांना आनंद झाला. त्यांची फार इच्छा होती कीं रामभाऊंनीं गांवीं येऊन आपणांस भेटावे; पण नोकरी लागल्यापासून दोन वर्षेंपर्यंत तरी तो योग जुळून आला नाहीं. त्यानंतर रामभाऊंनीं पंधरा दिवसांची रजा घेतली आणि ते आईबापांस भेटण्यासाठीं गांवीं आले. घरीं येतांच रामभाऊंवर नवीनच संकट उपस्थित झालें. त्याच्या प्रेमळ आईनें त्यांच्याजवळ प्रश्न काढला कीं, " भाऊ आतां तुला नोकरी मिळाली; तूं स्वतंत्र झालास. आतां लग्न करून एकादी मुलगी सून म्हणून घरांत आण. मलाही घरात मदत होईल. सुनमुख पहाण्याची मला फार इच्छा आहे."

आईचीच इच्छा ती !—आणि रामभाऊंची त्याला ना होती असेंही नव्हतें. त्यामुळें तो योग लवकरच जुळून आला. लग्न झाल्यानंतर लक्ष्मीबाई सातआठ वर्षे सासरींच होत्या. रामभाऊ दरवर्षी दहाबारा दिवसांची रजा घेऊन गांवीं जात. या अवधींत लक्ष्मीबाईंना दोन अपत्यें झालीं. एक मधुकर व दुसरा बाळकृष्ण. पण दोन्हीं मुलें अकालींच निधन पावलीं. त्यानंतर थोड्याच दिवसांत रामभाऊंनीं लक्ष्मीबाईंना मुंबईस आणून आपलें स्वतंत्र बिऱ्हाड स्थापिलें. आठ वर्षांपूर्वीच त्यांना नलूचा लाभ झाला; पण त्यांच्या आईबापांना मात्र ह्या अपत्यप्रेमाचा एकदोन वर्षेंच आनंद उपभोगतां आला. नलू हाच आतां रामभाऊंचा आणि

लक्ष्मीबाईचा आनंद होता. मागील दोन प्रसंगांमुळें लक्ष्मीबाईनाच नलू-विषयीं जास्त लडिवाळा होता. आईचेंच हृदय तें, तिचा प्रत्येक शब्द लक्ष्मीबाई फुलासारखा झेलून धरीत; आणि त्यामुळेंच आपल्या पति-राजांनीं आपल्या एकुलत्या लाडक्या नलूची एवढी साधी इच्छा पुरी करणें तर राहोच पण त्याबद्दल संमतीही देण्याची ज्यावेळीं नापसंती दाखविली त्यावेळीं तिला फार वाईट वाटलें.

त्या दिवशीं रामभाऊ आनंदांत असलेले दिसले. त्यांनीं संध्याकाळीं ऑफीसमधून आल्यावर भाजीची झोळी लक्ष्मीबाईकडे दिली. लक्ष्मीबाई झोळी घेऊन आंत चाललेली पाहून ते घाईघाईनें म्हणाले, "अन् हें पाहिलेंस का ग ?–मी आज नवा कोट शिवून आणला."

"कुठून आणला ? साहेबांनीं दिला वाटतं !" लक्ष्मीबाईना आनंद झाला तितकेंच आश्चर्य वाटलें.

"नाहीं ग ! त्या दिवशीं पगार झाला ना ?–म्हटलं साहेबांचा राग नको, घेतलं कापड विकत आणि दिला कोट शिवायला, तो आज तयार झाला."

"म्हणजे कोटाला पैसे खर्च केले म्हणायचे–आणि आपली नलू इतके दिवस सांगते आहे तर साडी आणायला पैसे नाहींत म्हणून सांगायचं ! तरी बरं एवढाच देवानं सांठा ठेविला आहे !"

लक्ष्मीबाईच्या डोळ्यांना पाणी आलं. त्यांनीं तोंड फिरवलें आणि कांहीं न बोलतां त्या स्वयंपाकघरांत निघून गेल्या.

रामभाऊंनासुद्धां लक्ष्मीबाईच्या शेवटच्या वाक्यानें वाईट वाटलें. त्यांना मागील प्रसंग आठवले व त्यांच्या स्मृतीनें त्यांच्याही डोळ्यांतून अश्रू आले. पण त्यांनीं स्वतःला सांवरून धरलें; मनाशीं निश्चय केला कीं पुढच्या पगाराच्यावेळीं कांहीं झालं तरी नलूसाठीं दोन साड्या आणायच्या आणि दोघींनाही खूष करायचं.



आज महिन्याची पहिली तारीख. रामभाऊंनीं सहा वाजतांच ऑफीस सोडलें. ते आज फारच आनंदांत होते. साहेबांनीं खूष होऊन आजपासून

त्यांना दहा रुपये प्रमोशन दिलें होतें; पगारही आज त्यांना मिळाला होता. नलूची आठवण होतीच. केव्हां एकदां आठवले-शहाडे यांच्या दुकानांत जातों. नलूसाठीं साड्या विकत घेतों आणि घरीं जाऊन तिला आणि नलूला केव्हां एकदां त्या दाखवतों असें होऊन गेलें. घाईघाईने ते आज प्रथमच ऑफिसांतून घरीं येतांना ट्रॅममध्ये चढले आणि एक आणा खर्च करून आठवले-शहाडेच्या दुकानीं आले. ही साडी बरी दिसते पण रंग चांगला नाहीं, ती चांगली पण भारी किंमतीची, हिचा रंग चांगला पण कांठच वाईट, असे तऱ्हतऱ्हेचें पसंती नापसंतीचे डाव बराच वेळ खेळून त्यांनीं नलूसाठीं दोन साड्या खरेदी केल्या आणि ते घरीं येण्यास आनंदाने निघाले.

" अग, हें पाहिलेस का ? आमच्या नलूसाठीं आज दोन साड्या खरेदी केल्या. " रामभाऊंनीं घरांत पाऊल टाकतां टाकतांच सुरवात केली.

" तें राहूं द्या ! "

" अन् साहेबानीं आज दहा रुपये प्रमोशन दिलं ! "

" मरू दे ते प्रमोशन ! अगोदर डॉक्टरकडे जाऊन औषध घेऊन या. "

" कुणासाठीं ? " रामभाऊ आश्चर्य चकीतच झाले. आपण काय बोलतों आणि ही काय म्हणते याचा उलगडाच त्यांना होईना. ते तसेच लक्ष्मीबाईकडे पाहूं लागले.

" कुणासाठीं म्हणजे ! आपल्या नलूसाठीं. अर्ध्या तासापूर्वी नलूला कसंसंच वाटूं लागंल म्हणून ती खेळायला शेजारी न जातां बिछान्यावर येऊन पडली. मी सहजच तिच्या अंगावरून हात फिरवला तों अंग तापानें फणफणत आहेसं वाटलं. " लक्ष्मीबाईच्या आवाजांत हुंदक्यांचा हुंकार आणि चेहऱ्यावर खिन्नतेची छटा स्पष्टपणें दिसून आली.

रामभाऊंना धक्काच बसला. मागील प्रसंगाची पुनरावृत्ती होते कीं काय अशी एक अंधुकशी कल्पना त्यांच्या डोक्यांतून झर्रकन् निघून गेली. ते त्याच पावलीं औषध आणण्यासाठीं माघारे फिरले.

" आई, मला तहान लागली ग ! थोडें पाणी दे ! " क्षीण आवाजांत शब्द आले.

" हें घे बरं बाळ. " लक्ष्मीबाईनीं थोडं थोडं पाणी चमच्यानें तिच्या तोंडांत घातलें.

" आई. अण्णानीं मला साडी आणली का ग ? "

" होय बरं बाळ ! तूं बरी झाल्यावर ती नेसायची हं. !

लक्ष्मीबाईंना हुंदका आला. कसातरी तिनें तो दाबला.

" आई, तूं रडतेस ? कां ? अन् मी केव्हां बरी होईन ग ? "

लक्ष्मीबाईंना रडूं कोसळलें. जवळच बसलेल्या रामभाऊंना तिच्या डोळ्यांतून वहात असलेला अश्रूप्रवाह दिसला. त्यांनाही फार वाईट वाटलं.

" लवकरच होशील बरं बाळ ! आतां औषध घेतेस ना ? " औषधाची वेळ झालेली होती अशी संधी साधून लक्ष्मीबाईनीं तिला औषध पाजलें आणि तें संभाषण थांबविलें.

पण—?

लक्ष्मीबाईसारख्या आईची सदा मायेची पांखर असतांना डॉक्टरनीं आपली पराकाष्ठा केली असतांना त्यानंतर दोन दिवसांतच नलूचा आत्मा देवाघरीं निघून गेला. लक्ष्मीबाईनें आक्रोश मांडला. एकामागून एक अशी तीन गोजिरवाणीं अपत्यें गेल्याचं दुःख कोणत्या प्रेमळ मातेला सहन करतां येईल ? रामभाऊंनासुद्धां अतोनात दुःख झालें.

प्रेमळ नलूच्या जिवितहीन देहाला अग्नि देऊन रामभाऊ घरीं आले ते वेड्यासारखे. खोलींत पाऊल टाकतांच त्यांच्या नजरेसमोर नलूचा चेहरा उभा राहिला. नलू अजूनही त्या खोलींत बिछान्यावर झोपलेली आहे असें त्यांना वाटूं लागलें आणि " आई आण्णांनीं मला साडी आणली कां ग ? " हें नलूनें आईस विचारलेलें वाक्य त्यांच्या कानांत घुमूं लागलें. त्यांना फारच वेदना झाल्या.

" काय मी दुष्ट ! माझी एकुलती एक नलू ? तिची साधी इच्छासुद्धां मला पुरी करतां आली नाहीं. किती अधम मी ? माझ्यासाठीं मी नवीन कोट शिवून घेतला, आणि—आणि नलूसाठीं ?—अरेरे, किती पापी मी ! "

रामभाऊ बडबडूं लागले. "आतां नलू कुठं बरं असेल ? तिचा आत्मा नव्या साडीसाठीं कुठंतरी तळमळत असेल." विचारांनीं रामभाऊचें डोकें फिरून गेलें...लगेच त्यांच्या चेहऱ्यावर थोडीशीच शांतता प्रगटली.

ते लगेच उठले. पेटीमधून त्यांनीं त्या दोन्ही नव्या साड्या बाहेर काढल्या, आपला नवीन शिवून आणलेला कोटही हातांत घेतला आणि स्वयंपाक घरांत जाऊन त्यांनीं त्या तिन्ही वस्तूंना हातांतील आगपेटीनें अग्नि दिला.

"आतां तरी नलूचा आत्मा शांत होईल का ? निदान माझ्या मनाला तरी थोडीबहूत शांती मिळाली." त्या अग्नीकडे पहात असतांनाच ते आपल्या मनाशींच म्हणाले.

त्या अग्नीच्या ज्वाळा नलूकडे गेल्या असतील का ?

---

## १० : : सुझान

त्या खेडेगांवच्या पलीकडे असलेल्या वालुकामय प्रदेशांतून कुणीतरी व्यक्ती आपला मार्ग धीमेपणानें आक्रमित होती. एका बाजूस पर्वतांच्या अजस्र रांगा अन् दुसऱ्या बाजूस नीलवर्ण रत्नाकराच्या लाटांतून उमटत असलेला गंभीर ध्वनी त्या वेळच्या संध्याकाळच्या भीषणतेंत अधिकच भर घालीत होता. डोंगराच्या पायथ्याशीं असलेल्या कांहीं झोंपड्यांतून एकादं वेळेस एकाद्या मिणमिण पेटत असलेल्या दिव्याचा मंद प्रकाश प्रवाशाच्या दृष्टीस पडे.

ती एक स्त्री होती. तिचें शरीर जरी मलिन व जुन्या वस्त्रांनीं झांकलें होतें तरी चेहऱ्यावरून व एकंदर प्रमाणबद्ध शरिराच्या बांधणीवरून तिचा कुठच्यातरी कुलिन घराण्यांत जन्म झालेला असावा, असें पहाणाऱ्याला वाटणें साहजिक होतें. तिची गौरवर्ण काया, पाणीदार तेजस्वी डोळे, चेहऱ्यावर सदा खेळणारें सुखसमाधानीचें लक्षण व आकृतीवरून उत्पन्न होणारा करारीपणाचा भाव, तिच्या कुलीनतेची साक्ष देत होता.

मोठ्या कष्टानें व प्रयासानें ती आपलें एक एक पाऊल टाकीत होती; यावरून तिनें बराच लांबचा प्रवास केलेला असावा असें भासत होतें. ती

आपल्या एकुलत्या एक लाडक्या बाळाला कडेवर घेऊन चालत होती आणि त्या भारामुळें तिला जलद चालण्यास बराच त्रास पडत होता.

रात्र बरीच झाली होती. जसजसा वेळ निघून जात होता तसतशी त्यावेळची रात्रीची भीषणता हळुहळू वाढत होती. थोड्या वेळानें त्या व्यक्तीला दूर अंतरावर कुठूनतरी येणारा मंदप्रकाशाचा स्रोत दिसला. त्या दिशेकडे त्या व्यक्तीनें पाहिलें आणि समाधानाचा एक सुस्कारा टाकला. दहा पंधरा मिनिटांतच ती त्या इच्छित स्थळीं पोहचली.

तें त्या खेडेगांवांतील एक दारूचें दुकान होतें. दुकानचा मालक बाहेरच्याच बाजूस अंगणांत मुद्दाम तयार केलेल्या मातीच्या सोप्यावर बसून विडी ओढीत होता. दुकानांत पुढील बाजूसच मालकाचा मुलगा पैसे वसूल करण्याकरितां एका उंच अशा खुर्चीवर बसला होता. त्याच्या पुढ्यांतच समोरील बांकावर निरनिराळ्या दराप्रमाणें दारूच्या बाटल्या भरल्या असून त्याच्या जवळच कांहीं रिकामी व कांहीं दारूनें भरलेलीं ग्लासें ठेविलीं होतीं. एका कोपऱ्यांत एक भलें मोठें, तोटी असलेलें पिप असून मधून मधून एखादा नोकर त्या पिपांतील दारूचे ग्लास भरून गिऱ्हाइकांना देत असे.

दुकानाजवळ येतांच सुझान ( कारण त्या प्रवासी व्यक्तीचें नांव हेंच होतें ) हीस घपकन दारूची घाण आली. परत फिरून पुढें कुठंतरी जावें, पण ह्या असल्या घाणीच्या जागेंत राहू नये, असें तिला वाटलें. ती परत फिरण्याच्या बेतांत होती. इतक्यांत तेथील दुकानांत मिणमिण पेटणाऱ्या दिव्याच्या मंदप्रकाशांत मालकाच्या नजरेंतून मात्र ती सुटूं शकली नाहीं.

मालकानें हांक मारून तिला काय पाहिजे म्हणून विचारिलें. तिनें निरखून त्या मालकाकडे पाहिलें. त्याच्या नजरेत तिला दयेचा सागर उचंबळत असलेला दिसला. चेहऱ्यावर कृतज्ञतेची व उपकार करण्याच्या जबरदस्त इच्छेची भावछटा पूर्णपणे उमटलेली तिला दिसली. तिचा निरुपाय झाला. मनावर आशेचें दडपण दडपलें गेलें. ती मोठ्या आणीबाणीच्या प्रसंगांत सांपडली होती आणि त्यावेळीं तिला कुणाचातरी आधार हवा होता. मालकाचा चेहरा दृष्टीस पडतांच तिला आपणांस आधार

मिळाला असें वाटलें तिच्या डोळ्यांतून दोन अश्रु टपकन् खालीं पडले. तिच्या नजरेपुढून गतायुष्यांतील दोन वर्षांचा मनोरंजक चलत्‌चित्रपट हलुहलू सरकूं लागला. ती स्तब्ध होती.

ø ø ø ø ø

—त्यावेळीं सुझान मुंबईतील एका ख्रिश्चन शाळेंत शिकत होती. शाळेस निघण्यापूर्वी कपडे करून ती एका भल्यामोठ्या आरशासमोर राहून स्वतःला पहात असे. त्यावेळीं तिला आपल्या सौंदर्याबद्दल फारच अभिमान वाटे. तिनें त्या वेळीं तारुण्यावस्थेंत नुकतेंच पदार्पण केलें होतें. किंचित् तिचा तो लांबट चेहरा, काळे टपोरे पाणीदार डोळे, बारीक पण लांब बांकदार भुवया, मानेवरून लहानशीच गुंफून सोडलेली वेणी, किरमिजी अगर पोपटी रंगाचा फ्रॉक, त्यावर गळ्याभोंवतीं, पाणीदार मोत्यांच्या मालिकेंत चमकून दिसणारा चांदीचा क्रॉस या एकंदर अंगविभूषतेवरून व शरीरसौष्ठवावरून ती सुन्दर होती असें कोणालाहि वाटलें असतें.

आणि त्यामुळेंच जोसेफ खरोखर धन्य होता. सुझानच्या मनांत दुसऱ्या कुणाबद्दल मैत्रीपलीकडे जी भावना उत्पन्न झाली नाहीं ती भावना—प्रणयाची भावना, उत्कृष्ट प्रेमाची भावना–जोसेफबद्दल तिच्या मनांत उत्पन्न झाली.

वरील गोष्टीस दोन महिने लोटले आणि त्या अल्पावधीच्या सुखदावस्थेनंतर काळाची भयंकर झडप आपल्यावर पडल्यासारखं सुझानला वाटलं. ती झडप म्हणजे सुझानच्या प्रेमाचा धिक्कार करणारे जोसेफकडून तिला आलेले तें एक पत्र होतें. सुझानच्या प्रणयाचा गुलाब खुरतडला गेला आणि जोसेफच्या हृदयाचा भ्रमर अंजेलाच्या हृदयसिंहासनावर जाऊन बसला. अंजेलानें जोसेफच्या हृदयाचा ठाव घेतला आणि सुझानच्या प्रेमांत माती कालवली.

सुझान उघडी पडली. हृदयाचा हिरा भंगला–जीवाचा आधार तुटला. ती पोरकी झाली.

होय ! खरोखरच ती पोरकी झाली. नव्हे तिनें दुसऱ्या एका जीवाला

पोरकं केलं. तें एक गोड बालक होतें. ल्यूसी लहान बालक जोसेफची ती एक प्रतिमा होती.

सुझानने वाट पाहिली. आपल्यासाठीं नव्हे तर केवळ आपल्या—नव्हे त्यांच्या—प्रेमळ प्रतिमेसाठीं ल्युसीसाठींतरी जोसेफ आपल्याकडे परत येईल अशी ती अपेक्षा करीत होती. पण दुर्दैवाने ती फोल ठरली. तिनें मनांत निश्चय केला आणि त्याच रात्रीं तिनें ल्युसीसह मुंबई सोडली.

याच मागील गोष्टींची जाणीव तिला त्या दारूदुकानच्या मालकानें 'तुला काय पाहिजे' हा प्रश्न करतांच झाली. पुरुषाच्या स्वार्थी वृत्तीचा तिला राग आला. अनाथ अबलांच्या दुबळेपणाची तिला कींव वाटली. सारेच पुरुष तिला जोसेफप्रमाणें स्वार्थी, लबाड आणि निष्ठुर वाटूं लागले. दारू—दुकानदाराची तिनें त्याच मालिकेंत गणना केली. पण तिनें त्या-वेळीं विचार केला. तिला जाणीव होती कीं त्यावेळीं ती पूर्णपणें निराधार होती.

ø ø ø ø

वरील सर्व गतगोष्टींचें पुसटलेलें चित्र तिच्या नजरेपुढून झरकन् निघून गेलें. तिनें त्या मालककाडे कृतज्ञतेनें पाहिलें व म्हटलें, "महाराज आज रात्रीसाठीं माझी झोंपण्याची व्यवस्था इकडे होईल का?"

"हो, न व्हायला काय झालं? पण त्याबद्दल तुम्हाला भाडे द्यावं लागेल." हंसत त्यानें उत्तर दिलें.

"किती?"

"निदान पांच रुपये द्यावे लागतील. कबूल असाल तर व्यवस्था करतों." आणि मालक सूक्ष्म नजरेनें तिच्याकडे पाहूं लागला. तिच्या एकंदर शरिराच्या सजावटीवरून तिच्याकडून भरपूर पैसा काढण्यास फारच सुलभ आहे, याचा त्या मालकानें मनाशीं अंदाज बांधला होता; व त्यासाठींच त्यानें त्या एका रात्रीसाठीं भारी भाडेंच सांगितलें.

सुझानजवळ आतांपर्यंत खर्च करून पन्नासएक रुपये शिल्लक होते. त्यांपैकीं नोकरीसाठीं मुंबईस परत जाण्यास तिला १०—१५ रुपये लागणार

होते व शिलकींपैकीं पांच रुपये एका रात्रीसाठीं भाडें म्हणून खर्च करून बाकीच्या वीसपंचवीस रुपयांत तिला आपल्या ल्युसीची तात्पुरती व्यवस्था करणें भाग होतें.

नाइलाजानें व मोठ्या कष्टानें ती त्या गोष्टीस कबूल झाली. मोठ्या आशेनें ती या घरांत शिरली व मनास मिळालेल्या शांततेमुळें ती लवकरच झोंपी गेली.

दुसऱ्या दिवशींची गोष्ट. सकाळींच सुज्ञान उठली. तिच्या चेहऱ्यावर समाधान–वृत्ती नाचत होती. ती आनंदांत होती. आदल्या रात्रीं तिच्या गोडसेदार बाळाला—ल्युसीला—आधार मिळाला होता. आतांपर्यंत तिला असत्यतेचा कटु अनुभव मिळाला होता. तिला सारेंच जग लबाड, फसवणारं अन् अनीतीनें भरलेलें वाटलें. तिला त्या दारु–दुकानदाराचा चेहरा साहरा वाळवंटांत सांपडणाऱ्या पाण्याच्या डबक्यासारखा वाटला. पण मनाला हुरहूर होतीच कीं आपण आतां मुंबईस गेल्यावर ल्युसीची व्यवस्था कोण पाहणार? सुदैवानें तीहि तिची अडचण दूर झाली. सुज्ञाननें ल्युसीच्या खर्चासाठीं दरमहा दहा रुपये पाठवावे व मुम्बईस निघण्यापूर्वी आगाऊ पंचवीस रुपये द्यावे, अशा अटीवर ल्युसीची काळजी घेण्याचें दारु–दुकानदारानें कबूल केलें. सुज्ञानला मनाची शांतता पाहिजे होती आणि ल्युसीच्या सौख्यांत तशा प्रकारची शांतता तिला मिळणार होती. ल्युसीचं सौख्य हेंच तिचं जीवन होतं, तिचा आनंद हेंच तिचं ध्येय होतें आणि तिचं भावी आयष्य हाच तिचा आत्मा होता. त्यासाठींच केवढेहि प्रसंग आले, कितीहि खर्च झाला तरी ल्युसीची भवितव्यता विपन्नावस्थेंत न जातां सुखांत जावी, अशी तिची प्रबल इच्छा होती. म्हणून ती वरील गोष्टीस कबूल झाली.

सुज्ञाननें मालकाचा निरोप घेतला. घरमालकिणीचा व तिच्या मुलांचा आनंदानें निरोप घेतला आणि तिनें ल्युसीकडे पाहिलें. तिच्या डोळ्यांतून अश्रूप्रवाह सुरू झाला. तिनें ल्युसीकडे धांव घेतली. चटकन् तिला उचललं. कितीदांतरी तिचे पटापट मुके घेतले आणि अनिमिष नयनाश्रूंनीं तिच्याकडे पाहूं लागली. कितीतरी वेळ ती ल्युसीकडे पहात होती.

ल्यसीला सोडून एकटेंच मुंबईस जाण्याचा मोह आंवरणें तिला कठिण वाटूं लागलें. पण तिचा नाइलाज होता. तशी भवितव्यता होती. शेवटीं मोठ्या मनोधैर्यानें तिनें मोह आवरला. आपल्या आवडत्या ल्युसीचे आंसवांनीं वहात असलेल्या डोळयांनीं मनमुराद दर्शन घेतलें व तिच्या कपोलभागाचे व केसांचें अनेकदां चुंबन घेऊन जड अंत:करणानें ती घराबाहेर पडली.

* * * *

मुंबईत एका गिरणींत मजूर म्हणून ती काम करूं लागली. दरमहा मिळणाऱ्या पंचवीस रुपड्यांतून ती वेळ न चुकवितां, विलंब न लावितां, न विसरत नियमितपणें दहा रुपये ल्युसीसाटीं दारु-दुकानदाराकडे पाठवीत असे, व राहिलेल्या १५ रुपयांत मुंबईसारख्या अफाट शहरांत आपली गुजराण करीत असे.

वरील गोष्टीस चार महिने लोटले. नित्यनियमाने दारुदुकानदाराकडून ल्युसीच्या खुशालीचें पत्र सुझानला येत असे. ती मे महिन्याची पांच तारीख होती. तो दिवस शनिवार होता, मोठ्या आनंदानें व आशेनें सुझान गिरणींतून दमूनभागून आली. आपल्या नांवें आलेलें पत्र पाहून तिचा आनंद द्विगुणित झाला. मोठ्या अधिरतेनें तिनें तें पत्र फोडलें.

वि. वि. ता.

तुमची मनिऑर्डर मिळाली. बाळ तेवढंसं सद्गुणी दिसत नाहीं. ल्युसीच्या आवडी पुरविण्याकरितां व तिला आनंदित टेवण्यासाठीं तिच्या-पायीं आम्हांस बराच खर्च करावा लागतो. तसेच ती खादाड बरीच आहे. करितां जादा पंधरा रुपये ताबडतोब पाठवले तर तिची यापुढें योग्य ती काळजी घेतली जाईल नाहींपेक्षां आपलं मूल आपल्या ताब्यांत घ्यावें. कळावें, पैसे लवकर पाठवावे हे वि.

—अंतोन

सुझानवर वज्राघातच झाला. गिरणींतील मजुराजवळ पंचवीस रुपये

कुठून मिळणार ? ती तिसऱ्याच दिवशीं गिरणीच्या मॅनेजराकडे गेली व आपली करुण कहाणी त्याला सांगितली.

सुझाननें खालीं घातलेली मान वर उचलली व आशाळभूत नजरेनें मॅनेजरकडे पाहिलें. त्याच्या नजरेंत आसुरी माया दिसली. पण ल्युसीची प्रेमळ प्रतिमा नजरेपुढून हालेना. ती तिथेंच थबकली. एकदां मॅनेजरकडे पाहिलें व मान खालीं घालून उत्तर दिलें, " साहेब, मला आतां दहा रुपयांची गरज आहे. मिळतील का उसने ? "

" सुझान, दहाच ना ? त्याला काय उशिर ? घे, हे आनंदानें घे !," असें हंसत हंसत म्हणून मॅनेजरनें आपल्या खिशातून दहाची नोट काढून तिच्या हातांत दिली. पण ती देताना त्यानें विकारी नजरेनें तिच्याकडे पाहिलें. पैसे घेण्यासाठीं पुढें केलेला हात आपल्या हातानें किंचित् दाबला व म्हटलें, ' सुझान, तुला गरज लागेल तें मागण्यास माझ्याडे अनमान करूं नकोस. '

त्याचदिवशीं सुझाननें मनि-ऑर्डरनें ते पैसे दारु-दुकानदाराकडे पाठविले. आपलें पुढील जीवन स्वतःच्या शीलाला धक्का लावून सुखी करण्याची तिची इच्छा नव्हती. असें असूनही मनिऑर्डर पाठविल्यानंतर तिला ल्युसीभोंवती पसरलेलें आनंदी वातावरण दिसले. तिला समाधान झाले. मॅनेजरची आपल्याशीं झालेली वर्तणूक ती विसरली. पैसे पोचल्याची पावती आली. तिला फार आनंद झाला.

ल्युसीस जोपासनेसाठीं दारु-दुकानदाराजवळ ठेवल्यास १ वर्ष झालें. वर्षाचा काळ चटकन् निघून गेला. हिंवाळा, उन्हाळा व पावसाळाहि संपला. आणि पुन्हा थंडीस सुरवात झाली. सुझानला तें सारं वर्ष एकाद्या युगाप्रमाणें वाटलें. पण ल्युसीच्या समाधानींत सुझानचा आनंद होता. तिच्या दुःखांत सुझानचा मृत्यु होता.

संध्याकाळचा गार वारा सुटला होता. त्या स्थितींत सुझान त्या दिवशीं कामावरून आली. तिनें आशाळभूतपणानें आपल्या नांवें खोलींत पडलेलें पत्र उचललें व वाचण्यास सुरवात केली—

पत्रांतील पहिल्याच वाक्यासरशीं तिला विलक्षण आश्चर्याचा धक्का बसला.

" ल्युसी आजारी! अरे देवा!" तिच्या तोंडून शब्द बाहेर पडले. तिनें कसंबसं तें पत्र पुरं वाचलं व धाडकन् जमिनीवर अंग टाकून ओक्साबोक्सी ती रडूं लागली.

पत्र पुढीलप्रमाणें होतें—

ल्युसी थंडीमुळें फार आजारी आहे. तिला अंगांत घालावयास गरम कपडे नाहींत. औषधपाण्यासाठीं खर्च फार होतो आहे. तरी पन्नास रुपये ताबडतोब पाठवून द्यावे. तरच ल्युसी ह्या आजारांतून लवकर उठेल.

—अंतोन

हें पत्र वाचून कितितरी वेळ सुझान रडत होती पण तिला त्या स्थितींत रहावेना. ल्युसीचा अन्त व आपला अन्त एकाचवेळीं होणार हें ती पूर्णपणें जाणून होती. ल्युसी जगांतून नाहींशी झाली कीं अपलाही अंतकाळ जवळ आहे, याची तिला जाणीव होती. पण आपल्या प्रीतीचें तें निष्पाप फूल जिवंत ठेवण्यासाठीं तें सुखी रहावें म्हणून ती जिवापाड श्रम करीत होती. ती उठली. ल्युसीसाठीं कांहींतरी करणार म्हणून उठली. पण करणार काय? या घटकेस पन्नास रुपये आणणार कोठून व आपण ही गिरणीमधील नोकरी सोडून ल्युसीकडे जाणार कसे? तिनें विचार केला. मनांत निश्चय केल्याचा आविर्भाव चेहऱ्यावर दर्शविला व तशीच संध्याकाळची ती खोलीबाहेर पडली.

गिरणीचे मॅनेजरसाहेब नुकतेच जेवण करून आरामखुर्चीवर बसून सिगारेट ओढीत होते. दारांत सुझानला पाहून ते आश्चर्यचकित झाले.

"सुझान, तूं इकडे, या वेळीं अन् अशा स्थितींत?"

सुझान कांहींही बोलली नाहीं. ती स्तब्धच होती. तिच्या नयनांतून मात्र अश्रुरूपी गंगा वहात होती.

"सुझान, चल ये, वर माडीवर जाऊं, मग सांग तूं कां रडतेस तें!' असें म्हणून मॅनेजरनें सुझानचा हात आपल्या हातांत घेतला व तिला घेऊन ते वरच्या मजल्यावरील बाहेरच्या दिवाणखान्यांत गेले. सुझाननें

मॅनेजरच्या वर्तणुकीशीं किंचित्‌ही प्रतिकार केला नाहीं. ती अधोमुखच त्याच्याबरोबर चालत होती.

"सुझान, मी तुला परका कां? असं काय बरं करतेस? सांग बरं तूं कां रडतेस तें?"

"मॅनेजरसाहेब, मी आज फार मोठ्या संकटांत आहें. मला आज पंचाहत्तर रूपयांची फार जरूरी आहे. उसने दिल्यास फार उपकार होतील." सुझाननें खालीं मान घालून स्फुंदत आपली अडचण सांगितली.

"हें बघ सुझान, पाऊणशें रुपयेच काय, पण तुझ्या सुखासाठीं पांचशेंहि रुपये खर्च करीन. पण तूं माझ्या म्हणण्यास होकार दे. तुझ्या सहवासाचें सौख्य मला लाभूं दे. निदान, आजच्या रात्रीसाठीं तरी—" असें म्हणून त्यानें तिला जवळ ओढली. डावा हात तिच्या हनुवटीखालीं धरला, उजवा हात तिच्या कपोलभागावर स्थिर केला आणि तिचा चेहरा किंचित् वर उचलून हंसत, आनंदानें, तिच्या अधरामृताचें मनसोक्त प्राशन केलें.

सुझान! आपल्या एकुलत्या एका प्रेमाच्या पवित्र प्रतिमेसाठीं—ल्युसीसाठीं, जीवाची—नव्हे—स्त्रीला जगांतील कोणत्याहि वस्तूपेक्षां अमोल वाटणाऱ्या पवित्र, मंगल शीलाची, पर्वा तिनें केली नाहीं. तिनें त्या रात्रीं मॅनेजरला आपल्या सहवासाचें स्वर्गीय सुख दिलें. ल्युसीसाठीं त्या रात्रीं तिनें राक्षसी आकांक्षेला आपल्या सुंदर अमोल कायेचा बळी दिला.

दुसऱ्याच दिवशीं सकाळीं ती मुंबईहून निघाली. आगबोटींतील प्रवासानें त्रासलेल्या, काळवंडलेल्या चेहऱ्यानें, पण समाधानाच्या आनंदी चेहऱ्यानें व काळजीनें हुरहुरणाऱ्या मनानें, तिनें दारुदुकानदाराच्या घरांत प्रवेश केला.

जमिनीवर एका फाटक्या सतरंजीवर ल्युसी निश्चेष्ट पडली होती. तिच्याजवळ दारुदुकानदाराच्या दोन मुलींशिवाय कुणीहि नव्हतें. त्या मुली एकसारख्या ल्युसीकडे पहात होत्या. सुझाननें एकदम धांवत जाऊन ल्युसीस मिठी मारली. ल्युसीनें डोळे उघडून आपल्या मातेकडे पाहिलें. नजरेला नजर भिडली, हृदयाची ओळख हृदयाला मिळाली. मृदु पण क्षीण हास्यांत ल्युसीचें निष्पाप हास्य विलीन झालें. सुझाननें

चटकन् ल्युसीला उचललें व तिला आपल्या हृदयाशीं धरून तिचे कितीदांतरी मुके घेतले. मातेचें प्रेम?—सारी दुनिया ह्या प्रेमापुढें फिकी पडेल.

सुझाननें ल्युसीचें पुन्हां एकदां चुंबन घेतलें व तिला खालीं ठेवलें. माय--लेकीनें पुन्हां एकमेकांकडे पाहिलें. ल्युसी हंसली व त्या हास्यांतच तिनें क्षीणतेमुळें डोळे मिटले.

सुझान समजली. तिनें हंबरडा फोडला आणि क्षणार्धांत तीहि धाडकन् जमिनीवर मूर्च्छित पडली.

त्याच वेळीं दोन निष्पाप जीव एकमेकांकडे दीन नजरेनें पहात परलोकची वाट चालत होते.

[ व्हिक्टर ह्यूगोच्या ' ला मिझरेबल्स् ' कादंबरीच्या आधारें. ]

—चित्रा ता. १९ डिंसेंबर १९३७

---

## ११ : : वेडी कुमुद

अलहाबाद एक्सप्रेस सुटायला अद्याप अर्धा तास होता. पण मला तो वेळ भरभर निघून चालला असें वाटूं लागलें. आणखी अर्ध्या तासानें माझी प्रिय आणि माझ्या भावी जिवनांत माझ्याशीं समरस होऊन मला सुख देणारी कुमुद कांहीं काळपर्यंत तरी माझ्या दृष्टीपथांतून नाहींशी होईल आणि केवळ तिच्या आठवणीवरच विरहाचें दुःख सहन करावें लागेल या विचारानें मला कसंसंच वाटूं लागलं. निघून चाललेला प्रत्येक क्षण मला पुढील क्षणाची आठवण करून देत होता. माझी प्रिय कुमुद आज जळगांवास आपल्या काकांच्याकडे तिच्या चुलतबहिणीच्या आजारीपणासाठीं निघाली होती. मी व तिची आई अशीं तिला 'सेण्ड-ऑफ' देण्यासाठीं बोरीबंदरवर आलों होतों. मी आणि कुमुद त्यावेळीं सेकंड क्लासमधील एका बेंचवर बसून गोष्टी करीत होतों. तिची आई 'मी द्राक्षें घेऊन येतें हं!' असें कुमुदला सांगून त्या निमित्तानें प्लॅटफॉर्मवर इकडून तिकडे फिरत होती. कांहीं क्षण गेल्यावर हळुच माझे दोन्ही हात आपल्या मांडीवर घेऊन ती म्हणाली, "माझी थोडीशी आठवण होईल ना?"

"संशय वाटतो कां?" मीच हंसत उलट प्रश्न केला.

" आणि समजा मी परत आलेंच नाहीं तर ? पार विसरून जाल नाहीं ? " यावेळीं तिनें आपली दृष्टी माझ्या नजरेवर स्थिर केली. पण तेवढ्या अवधींत तिच्या नजरेंत आणि आवाजांत अस्पष्टपणें उमटलेली दुःखाची छटा मला जाणवल्यावांचून राहिली नाहीं.

" अंतरानें कां आठवणी बुजून जातात ? " मी म्हटलें, " पण कुमुद, तुला वाईट कां वाटलं ? "

" कुठं ! उगीच ! " असें म्हणून ती हंसली आणि तिच्या त्या गोड हास्यांतच तिच्याविषयींचे आतांच उत्पन्न झालेले माझे विचार विराम पावले.

या व अशाच गोष्टींत अर्धा तास केव्हां निघून गेला हें मला समजलेंच नाहीं. परन्तु गाडी सुटण्यापूर्वी झालेली शिटी ऐकून मी भानावर आलों. तिच्या हाताचें मी लगेच चुंबन घेतलें आणि एकदां स्निग्ध पण अश्रुपूर्ण नजरेनें तिच्याकडे पाहून मी प्लॅटफार्मवर उतरलों. तितक्यांतच ताई ( कुमुदची आई ) द्राक्षें घेऊन आली व " कमू, हीं ठेव बरं ! व वेळेवर पत्र पाठवित जा ! " असं म्हणून तिनें तीं तिच्या हातांत दिलीं. मी कुमुदशेजारींच खिडकीजवळ प्लॅटफार्मवर उभा होतों. ताई माझ्या मागेंच माझ्याजवळ उभी होती. गाडी चालू झाल्यावर गाडीला थोडासा धक्का बसला. कुमुदनें माझ्याकडे अश्रुपूर्ण नजरेनें पण किंचित् सस्मित् वदनानें पाहिलें, व " बरं आहे ! बाय् बाय् ! पत्र पाठवायचं हं ! " असें म्हणून तोंड फिरविलें.

" तुझ्याकडून अगोदर येऊं दे ! पैसे नसल्यास मी पत्रांतून तिकिटें पाठवीन कीं ! "

" बरं आहे ! वाट पहातें ! "

" बाय् बाय् ! "

नजरेला नजर भिडली. हवेंत हातरुमाल उडाले व त्यावेळींच गाडीला वेग मिळून ती स्टेशनबाहेर पडली.

गाडीप्रमाणेंच माझ्याही हृदयाला थोडासा धक्का बसला आणि लगेच तिची प्रतिमा नयनावाटें बाहेर पडली.

घरीं आलों तों विषण्ण मनःस्थितींतच. कांहींतरी वाचावें म्हणून पुस्तक उघडलं पण लक्षच लागेना. कुमुदबद्दलचे सारे विचार डोळ्यांपुढें थैमान घालूं लागले. झोंपावें म्हणून कॉटवर पडलों पण झोंप येईना. एकच देखावा–मी, कुमुद व भोवतालचें आनंदी वातावरण–मला दिसूं लागलें. आणि याच देखाव्यांत मला मागील एक दोन वर्षांत घडलेल्या कुमुद-विषयींच्या साऱ्या गोष्टी चित्रित केलेल्या मला आढळल्या—

दीड वर्ष झालें त्या गोष्टीला. त्या दिवशीं मी माझें प्रॅक्टीकल (त्यावेळीं मी इंटर सायन्सच्या वर्गांत होतों.) लवकर संपल्यामुळें तीनलाच घरीं आलों होतों. खोलीच्या दरवाज्याला कुलूप लावलेलें पाहून मला थोडसें आश्चर्य वाटलें. खोलींत शिरतांच टेबलावरच माझ्या नांवाची चिठी असलेली मी पाहिली. तीच्यावरील ‘जरूर’ या सूचनेकडे माझें लक्ष गेलें म्हणून घाईघाईनें ती उघडून मी वाचली.

“एकाएकी माईच्या छातींत अतिशय दुखूं लागल्यामुळें तिला डॉ. देशपांडे यांच्या हॉस्पिटलांत नेलें आहे. तिकडे ताबडतोब यावें.

यशवंत”

थोडासाच पण मी गोंधळून गेलों. भिती वाटली. तसाच मी परतलों. खोलीला कुलूप लावलें व घाईनें हॉस्पिटलांत जाण्यास निघालों.

हाऊससर्जन माझ्या ओळखीचेच होते. दारांतच मला ते भेटले. विचारपूस करतां त्यांनीं सांगितलें कीं, घाबरण्याचें कारण नाहीं. माई आतां स्वस्थ झोंपल्या आहेत. सोबतीला खोलींत कोणीतरी तिच्या ओळखीची मुलगी आहे. “माई झोंपली आहे तर विनाकारण जाऊन त्रास कां द्या” असें मला वाटलें पण तें क्षणभरच. लगेच ती मुलगी कोण आहे हें पाहण्याची जिज्ञासा मनांत उत्पन्न झाल्यामुळें मी जिना चढून माईच्या खोलींत शिरलों.

माई स्वस्थपणें कॉटवर डोळे मिटून पडली होती. कॉटशेजारींच खुर्चीवर कसलेसें पुस्तक वाचीत कुमुद बसली होती. मला आंत आलेला पाहतांच ती उठून खुर्चीलाच टेंकून उभी राहिली व हंसत म्हणाली, “कॉलेजमधून आतां आलां?”

" हो ! घरीं टेबलावर यशवंतची चिठ्ठी मिळाली म्हणून ताबडतोब इकडे आलों. पण यशवंत ऑफिसांत गेला कीं काय, आणि तुम्ही इकडे कशा ? "

" त्यांना ऑफिसांत जायचं होतं म्हणून ते तिकडे गेले पण जातांना त्यांनीं आमच्या घरीं फिरून कळविलें म्हणून मी इकडे आलें. "

" म्हणजे सकाळपासूनच ड्यूटीवर आहां म्हणायचें ! "

" हो तसं म्हटलं तरी चालेल. ड्यूटी केल्याबद्दलचा पगार मात्र मिळं दे ! " असें म्हणून ती किंचित् हंसली व त्यामुळें मलाही हंसू आलें. मी तसाच तिच्याकडे पहात कॉटला रेलून कितीतरी वेळ उभा होतों; तीही उभी होती.

" म्हटलं, उभं राहाण्याची शिक्षा नाहीं केली कुणी ? " माझ्याकडे पहात तिनें म्हटलं.

" म्हणजे, शिक्षा करण्याचा अधिकार आपल्याकडे आहे तर! मीही जरा विनोदानं म्हटलं, याचवेळीं कुठल्या तरी संवेदनेनें मनाला आंदोलन मिळाल्याचा भास झाला. मी त्या खुर्चीवर बसलों आणि कॉटवर पडलेला ' यशवंत ' चा अंक चाळण्यास सुरवात केली. कुमुद माझ्याप्रमाणेंच खुर्चीवर हात ठेऊन उभी होती.

" ही रीडींग-रूम आहे वाटतं ? वाचायचं नसतं इथं ! " मला वाचनांत गुंग झालेला पाहून तिनं म्हटलं.

" अस्स ? " मी मान लांब करून वरच्या नजरेनें तिच्याकडे पहात प्रश्न केला, " मग काय करायचं असतं इथें ? "

" माझ्याबरोबर गोष्टी करायच्या ! "

तिच्याकडे मी क्षणमात्र पाहिलें, यशवंत खालीं ठेवला आणि तिच्या हातांत असलेलें पुस्तक घेऊन तें चाळूं लागलों.

" माझ्याबरोबर गोष्टी करायला आवडत नाहीं ? " तिनें लटक्या रागानें विचारिलें.

" कुमुद, तूंच माझ्या जीवनाची गोष्ट ! पण माईला त्रास होईल ना ? "

**प्रेमी जीवांच्या आठवणी अंतरानें अस्पष्ट व दुरावलेल्या होतात असा विचार करणारी कुमुद वेडी नव्हे काय ?**

" चला, आपण गॅलरींत गोष्टी बोलूं. " असें म्हणून तिनें माझ्या हातांतील ते पुस्तक घेऊन कॉटवर ठेविलें व ती गॅलरीकडे वळली.

" या, ना ! "

" चला ! " मी गॅलरींत आलों. तिनें गॅलरींत खुर्ची आणलेली पाहून मी विचारिलें, " खुर्ची कुणासाठीं ? "

" इश्श ! हें काय ! तुमच्यासाठीं. "

" मी बसूं आणि तुम्ही उभ्या रहाणार वाटतें ? "

" मग काय करूं ? "

" इथं या खुर्चीवर बसा, नाहींतर मीच उभा राहतों ! " असें म्हणून मीच तिच्या शेजारींच कठड्याला रेलून उभा राहिलों.

कितीतरी जीवाभावाच्या गोष्टी केल्या मी त्यावेळीं. संध्याकाळ होतांच कुमुद आपल्या घरीं निघून गेली. मी खुर्चीवर बसून माईकडे पहात कुमुदविषयीं विचार करूं लागलों.

यानंतर एक आठवड्याचीच गोष्ट. मी व कुमुद समुद्रावर फिरावयास निघालों होतों. घराबाहेर पडतांच ती म्हणाली, " मी बरोबर आहे म्हणून लाज नाहीं ना वाटत ? "

" कोणी विचारल्यास मी माझी मोलकरीण म्हणून सांगितली तर ? "

" लोकांना तें खरं वाटेल ! पण— "

" पण ? पण काय ? " मी थोडासा गोंधळून प्रश्न केला.

" पण निराळ्या अर्थानें. " मला परत त्याच शंकित संवेदनेचा भास झाला.

वाळवंटांत एका निवांतस्थळीं बसल्यावर ती म्हणाली, " मी तुम्हांला एक प्रश्न विचारूं का ? "

" एकच का ? "

" हो ! पण उत्तर द्याल ना ? "

" देण्यासारखं असल्यास देईन ! प्रश्न तर कळूं दे ! "

" नकोच आतां! तुम्ही उत्तर देणार नाहीं अन् कांहीं नाहीं; उगाच कशाला?"

" राग आला वाटतं! विचारा ना! खरोखर उत्तर देईन."

" तुम्ही लग्न कां करत नाहीं?"

" कां? एकादी 'एजन्सी' घेतली आहे वाटतं?"

" तसं नव्हे! पण आम्हांला पाहुणा म्हणून येतां येईल."

" अस्सं! मग तुम्हीं करून टाका कीं, मी येईन दर रविवारीं चहा प्यायला!"

" पण मी दिला नाहीं तर?" तिनें मोठ्या तोऱ्यांत उत्तर दिलें.

" हक्कानें मागून घेईन!"

" कुणाकडून?" तिनें हंसत हंसत प्रश्न केला.

" तुमच्याकडून."

" माझ्याकडून मागून घ्यायला तुम्हांला हक्क कुणी दिला?"

" कुणी म्हणजे? तुम्ही!" तीच शंकित संवेदना मला पुन्हां भासली. मी लगेच कुमुदचे दोन्ही हात पकडले व विचारिलें, " कुमुद, तूं माझी होणार ना?"

तिनें उत्तर दिलें नाहीं. ती निश्चलपणें माझ्याकडे पहात होती. ती बोलत नाहींसे पाहून मी विचारिलें, " कुमुद, बोल ना, मला सुखी करशील का?"

" मधुकर, पूर्वस्मृती नसत्या तर कदाचित्—" पुढें तिच्यानें बोलवेना. तिनें तोंड फिरविलें आणि रडूं लागली.

" कुमुद, कुठल्या पूर्वस्मृती?"

कुमुद कांहींच बोलली नाहीं. तिच्या हातांत असलेल्या माझ्या दोन्ही तळहातावर तिनें आपल्या नखांनीं रेघोट्या काढण्यास सुरवात केली. कांहीं वेळानें तिनें माझे दोन्ही हात सोडले व " चला ना घरीं जाऊं या! बराच उशीर झाला." असें म्हणून ती उठून उभी राहिली. मीही उठलों व तिच्या बरोबर चालूं लागलों! वाटेंत माझ्या मनांत तिच्या

पूर्वस्मृतीबद्दलचे विचार चालू होते. तीही कदाचित् त्याचविषयीं विचार करीत असावीशीं मला त्यावेळीं वाटलें.

आणि त्याच तिच्या पूर्वस्मृतीबद्दलचे विचार आजही मी बिछान्यांत पडून राहिलों असतांना माझ्या मनांत येऊं लागले. मी पुष्कळ विचार केला पण कांहींच अर्थबोध होईना. इतके दिवस माझ्याशीं आपल्या पूर्व-स्मृतीबद्दल एकही शब्द तिनें बोलूं नये याबद्दल मला तिचा थोडासा राग आला, पण लगेच तिच्या त्या शांत, आनंदी आणि निर्मल चेहऱ्याची आठवण झाल्याबरोबर तो तावडतोब नाहींसा झाला.

यानंतर बरोबर एक आठवड्याचीच गोष्ट. पण त्या गोष्टीनें मला कुमुदच्या पूर्वस्मृतीची आठवण करून दिली आणि उलगडाही झाला. त्या दिवशीं मी कॉलेजमधून घरीं येतांच मला कुमुदचें सुखरूपपणें पोहचल्याबद्दलचें पत्र मिळालें. त्यांतच तिनें आपल्या आईलाहि एक पत्र पाठविलें होतें. तें देण्यासाठीं म्हणून मी गेलों.

" या, बसा ! " मला पहातांच तिनें म्हटलें.

" आजच कुमुदचं सुखरूपपणें पोहचल्याबद्दल पत्र आलें व त्यांतच तुमच्या नांवचें एक पत्र होतें म्हणून आलों. खुर्चीवर बसतां बसतांच मी माझ्या येण्याची प्रस्तावना केली व पत्र काढून तिच्याजवळ दिलें.

तिनें पत्र वाचण्यास आरंभ केला. मीही टेबलावरील पुस्तक चाळलं आणि सहजच टेबलाचा खण उघडला. वरच त्या वर्षाची डायरी पडलेली होती. मी ती उचलली व पानें उलटण्यास आरंभ केला. कुठ-ल्याशा एका पानावर माझें लक्ष गेलें. त्यावर लिहिलें होतें.

गुरुवार,

मी आज मधुकराबरोबर चौपाटीवर फिरायला गेल्यावेळीं त्यांनीं विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर मला देतां आलें नाहीं. मी काय उत्तर देऊं ? मला ते आवडतात. मीही त्यांना आवडत असेन. पण त्यांच्या सुखासाठीं मला त्यांना विसरलेंच पाहिजे. माझ्या शीलाविषयीं लोक शंका घेतात हें जर त्यांना समजलें तर ते माझा स्वीकार करतील का ? पण नाहींच-मला त्यांचा मोह आवरलाच पाहिजे. किती प्रेमळ त्यांचा स्वभाव ! किती

आनंदी त्यांची मुद्रा ! मला त्यांना सुख देता येईल कां ? पण नको. त्यांना माझा विसर पडलाच पाहिजे. मला विसरल्यावरच ते सुखी होतील.

याच्या अलिकडील तीन चार पानें आपल्या पूर्वस्मृतीनें भरून काढलीं होती. तिचें शील व पूर्वस्मृती याचा मला उलगडा झाला. आणखी दहा पंधरा पाने कोरीं ठेवून पुढील पानावर तिनें लिहिलें होतें.

शनिवार,

कालच काकांचे पत्र आलें. उद्यां मी त्यांच्याकडे जाणार. खरा आनंद होतो आहे मला. आतां मी कशाला येतें. निदान मधुकरांच्या सुखासाठीं तरी मला येतां कामा नये. त्यांना माझा विसर पडेल आणि त्यांतच मला आनंद होईल.

डायरींतून एकंदर मजकूर वाचून मला सर्व गोष्टींचा उलगडा झाला.

" एकूण कुमुद, परत येणार नाहीं तर ! " मी माझ्या मनाशींच म्हटलं. इतक्यांत—

" कुमुदचा प्रवास मजेत झाला तर एकूण ! " ताईनें पत्रावरून दृष्टी वळवून म्हटलें.

"असं दिसतं खरं ! " मी कांहींतरी बोलावें म्हणून बोललों.

यानंतर ताईनें माझ्याबरोबर कितीतरी गोष्टी केल्या. पण त्याकडे माझें मुळींच लक्ष नव्हतें. मी त्या क्षणापासून कुमुदविषयींच विचार करीत होतों.

" किती वेडी कुमुद ! " माझ्या मनांत विचार आले. " तिला वाटतं कीं अंतरानें प्रेमीजीवांच्या आठवणी अस्पष्ट आणि दुरावलेल्या होतात. उलट अंतरानें त्या समुद्राच्या लाटांप्रमाणें वारंवार जास्त वाढत जातात. पण तिला काय कल्पना ! अल्लड ती ! आतां पहा ती परत येते कीं नाहीं ती ! " मी माझ्याशींच हंसलों व त्याचवेळीं ताईनें आंतून चहा आणून टेबलावर ठेविला त्याकडे पाहत राहिलों.

—वसुंधरा २९-८-३६

---

## १२ : : त्याची बहीण

मध्यरात्रीच्या सुमारास लखूचा आत्मा इहलोक सोडून निघून गेला.

मरतानां शेवटच्या घटकेस त्यानें विठूस आपल्याजवळ बोलाविलें आणि क्षीण आवाजांत म्हटलं, ‘ विठू, बाळ ! मी आतां चाललों. तुझा संसार पहाण्याची माझी फार इच्छा होती पण परमेश्वरानं ती पुरी केली नाहीं. दुर्दैव माझं ! माझ्या भिकीचाहि सुखानं चाललेला संसार पांडु-रंगाला पाहवला नाहीं. बिचारी भिकी !” आणि त्यानें डोळे वर करून डोक्याशेजारींच बिछान्यावर बसलेल्या भिकीकडे पाहिलें. “सोन्यासारखी माझी पोर ! किती सद्‌गुणी. सुंदर न्‌ प्रेमळ ! पण दैवाला तिचं सुख पाहवलं नाहीं. दुर्दैवानें तिच्या संसाराचा अशा रितीनें घात झाला. बाळ विठू ! आतां तूंच तिचा आधार. तिचा संभाळ कर. तिला कसलंहि उणं पडूं देऊं नकोस, कसल्याहि रीतीनें तिला दुखवूं नकोस ! बिचारी पोर ! अजाण आहे ती. कुठंतरी चुकेल, जिवाचं कांहींतरी करील; पूर्ण लक्षांत ठेव आणि तिच्याबरोबर सुखानें रहा. तुम्हां दोघांस सुखांत पाहिली कीं माझ्या आत्म्यास शान्ति मिळेल. बाळ भिकी–”

“ काय बाबा ! ” सद्गदीत होऊन तिनें विचारलें.

“ बाळ, आतां मी चाललों ! आतां विठूच तुझा आधार. तो तुझा

भाऊच आहे. त्याच्याशीं प्रेमानें वाग आणि नेहमीं आनंदानें सुखांत रहा. ”

“ बाबा ! असं काय हो बोलतां तुम्ही ?” तिनें लखूच्या कुशींत आपलं तोंड खुपसलं व ती रडूं लागली. विठू तिच्या शेजारींच बसून रडत होता.

आणि त्या दोघांच्या रडण्यांतच जणू काय निद्रावश होऊन लखूनें डोळे मिटले. चिमुकलं बाळ रडत रडत असेंच झोपतें नाहीं का ? पण लखूचं झोपणं शेवटचंच ठरलं.

सारी स्तब्धता होती. विठू आणि भिकी साश्रुनयनांनीं आपल्या प्रेमळ पित्याच्या त्या मृत शरीराकडे पहात होतीं.

“ दादा, आतां मी एकटी झालें रे !” भिकीनें टाहो फोडला. आणि ती मृत पित्याच्या अंगावर पडली.

“ नाहीं बाळ ! तूं एकटी नाहींस ! हा मी तुझा भाऊ इथं असतांना तुला मी निराधार राहूं देणार नाहीं. ”

“ पण दादा, काय रे हें झालं ? देवाला आपलं सुख पहावलं नाहीं का रे ? बाबा, बाबा, बघा ना हो या तुमच्या भिकीकडे ! ”

“ बाळ भिकी. मनुष्याचं मरण त्याच्या आधीन नसतं. आपले बाबा आपणांस सोडून गेले. त्यांनीं जावं अशी परमेश्वराची इच्छा दिसते. त्याची मर्जी. ”

दुःखातिशयानें व्याकूळ झालेले ते दोन जीव. भिकी व विठू त्या घरांत एकटेच उरले. दोघांनीं आतां एकमेकांना आधार द्यायचा होता. एक-मेकांच्या सहवासांत प्रत्येकानें आपापलं सुख मिळवायचं होतं. जगाची रीतच नाहीं का अशी ? त्याला भिकी न् विठू अपवाद कशीं ठरतील ?

काळ हें दुःखाचा विसर पाडणारं एक रामबाण औषध आहे. भिकी न् विठूच्या बाबतींत तसंच घडलं. हळूहळू त्यांचाहि दुःखभार हलका होऊं लागला. लखूच्या मृत्यूची त्यांना तेवढीशी आठवणहि राहिली नाहीं.

विठू परळच्या कुठल्याशा गिरणींत नोकरीस होता. महिना पंधरा रुपये मिळत होते त्याला. वडील वारल्यानंतर खर्च झेपेना म्हणून आपल्या

बहिणीबरोबर–भिकीबरोबर राहण्यासाठीं पूर्वीची जागा सोडून स्वस्त भाड्याची नवी जागा त्यानें घेतली.

सकाळीं सातला विठू गिरणींत कामावर जाई, तो संध्याकाळीं साडे-पांच सहाच्या मानानें हळूहळू सोबत्यांबरोबर गोष्टी करीत, दमूनभागून घरीं येई. दुपारच्या विश्रांतिच्या वेळीं भिकी एका लहानशा डब्यांत चटणी–भाकर व थोडीशी भाजी बांधून त्याच्याकरितां गिरणींत नेत असे. भिकीच्या प्रेमळ सहवासांत विठूला गिरणींतील साऱ्या दिवसाच्या श्रमांचें कांहींसुद्धां वाटत नसे. घरीं आल्यानंतर तिचा निर्मळ, शांत, हंसरा चेहरा पाहिला व तिच्या नाजूक ओंठांतून प्रेमानं बाहेर पडलेले चार शब्द ऐकले कीं, विठूला फार आनंद होई आणि त्या आनंदाच्या सौख्यांतच तो आपली उरलेली रात्र मजेनें घालवी.

आपल्या बहिणीबद्दल त्याला फार अभिमान होता. तो पुष्कळ वेळां एकटा असतांना विचार करी, "आपली भिकी प्रेमळ आहे, सुंदर आहे, भोळी आहे! दुर्दैवानें तारुण्याच्या उमदानींत तिच्या सौभाग्यावर व सौख्यावर काळाचा कणखर हात आकस्मिक रीतीनें पडला. दुर्दैव तिचं! वडील हयात असेपर्यंत त्यांनीं तिचं पालनपोषण केलं. संरक्षण केलं. तिला कांहींही उणं पडूं दिलं नाहीं. आज ते हयात नाहींत. त्यांनीं भिकी-विषयींची सारी जबाबदारी मरतांना माझ्यावर सोंपवलेली आहे. अशा एकंदर परिस्थितींत तिला सौख्य देण्याचा मी प्रयत्न केला पाहिजे. नव्हे, तसं करणं आपलं कर्तव्य आहे. बाबांनीं मरतांना तसंच सांगितलं नाहीं का आपल्याला!"

भिकी खरोखरच सुंदर होती, प्रेमळ होती न् भोळी होती. मराठे-कुळांत जन्माला आलेली होती तरी तिचं सौंदर्य पांढरपेशांत जन्मलेल्या एखाद्या तरुणीलाहि लाजविणारं होतं. मोहक, गोल चेहरा, विपुल, काळा केशसंभार, उन्नत वक्षःस्थळ, नजरेंतील तजेला, हांसतेवेळीं दोन्ही गालाला पडणाऱ्या इवल्याशा खळ्या, नाजूक गुलाबी ओठांतून अस्पष्ट दिसणाऱ्या शुभ्र दंतकळ्या आणि एकंदर सुटसुटीत भरीव न् बांधेसूद शरीर या सर्व गोष्टीमुळे तिची मूर्ति फारच आकर्षक दिसत असे.

विठू तिला फार जपून वागवित होता. लग्नानंतर दोन वर्षांच्या आंत, तारुण्याच्या ऐन उमदानींत दुर्दैवानें तिचा सौभाग्यालंकार हरवला होता. संसारांतील पतिसुख तिला फारच थोडे दिवस लाभलें. बिचारी भिकी. आणि या साऱ्या गोष्टी लक्षांत घेऊन विठू आपल्या वडिलांची शेवटची इच्छा त्याच्या शक्तीनुसार पार पाडीत होता. तिची प्रत्येक आवड, तिची प्रत्येक इच्छा पुरी करण्यासाठीं तो नेहमीं धडपड करीत असे. तिच्या आनंदासाठीं त्यानें आपल्या आवडीची पर्वा केली नाहीं. तिच्या सौख्यासाठीं त्यानें आपल्या सौख्यावर पाणी सोडलं. आपल्या शरीरस्वास्थ्याची, आपल्या प्रकृतीची त्यानें किंचितृहि पर्वा केली नाहीं. त्याचा सारा पैसा, त्याचे सारे श्रम, सारी धडपड, सारे विचार एकाच गोष्टीसाठीं होते. आणि ती गोष्ट म्हणजे त्याची एकुलती एक सुंदर, प्रेमळ न् भोळी बहीण भिकी या जगांत कोणत्या रीतीनें सौख्यांत आनंदांत अन् मजेंत राहील, ही होती. तो आपलं सारं सर्वस्व तिच्या सुखासाठीं खर्च करीत होता. विठूचं आपल्या बहिणीवरील केवढं हें अलौकिक प्रेम!

तो शनिवारचा दिवस होता. दमूनभागून विठू त्या दिवशीं घरीं येत होता. घरीं येतांच प्रेमळ बहिणीनें तयार केलेलं जेवण जेवण्यास तो बसला. समोरच त्याची बहिण भिकी उभी होती.

" दादा, परवां माझा वाढदिवस! आठवण आहे ना?"

" हो तर! तुझा वाढदिवस मी कसा विसरेन? तुला वाढदिवसाकरितां काय हवंय तें सांग." त्यानें हंसून विचारलें.

" दादा, मला छानसं पातळ घेऊन ये! चांगलं तलम पातळ नेसायची मला फार इच्छा आहे! आणशील?" तिनें आपली मान डाव्या खांद्यावर किंचित् कलती केली आणि लडिवाळपणानें हांसून विचारलें.

" आणीन बरं भिकी! पातळच काय पण तूं काय सांगशील तें आणीन! तुझ्या सुखासाठीं हा तुझा भाऊ विठू काय करणार नाहीं!"

" दादा. तूं किती किती चांगला आहेस रे!" आणि ती पुन्हां विठूकडे पाहून हांसली.

"आणि तूं चांगली नाहींस का?" असं म्हणून त्यानेंहि वर मान करून तिच्याकडे पाहिलें आणि तो हांसला.

पण रात्रौ झोंपतेवेळीं बिछान्यावर पडल्यानंतर त्याचे विचार सुरू झाले. "परवां वाढदिवसासाठीं भिकीला तलम पातळ आणीन म्हणून सांगितलें! तिचीहि तसलं पातळ नेसण्याची फार इच्छा आहे. तिचा नवरा आज जिवंत असता तर त्यानें नाहीं का आपल्या बायकोची—भिकीची—इच्छा पुरी केली असती. पण तिच्या कमनशिबानें तिला तें सुख मिळालें नाहीं. बाबा हयात होते तोंपर्यंत तिच्या साऱ्या इच्छा ते पूर्ण करीत. पण तेहि आम्हां दोघांस सोडून गेले. दुर्दैवानें अगर सुदैवानें तिच्याबद्दलची सारी जबाबदारी माझ्यावर पडली. मग एवढीहि माझ्या अभागी भिकीची इच्छा मी पुरी करूं नये काय?" आणि इथंच त्याचे विचार एकदम थांबले. कारण परिस्थितीचा जबरदस्त धक्का त्याला जाणवला. आजतरी तिची इच्छा पूर्ण करणं त्याला शक्य नव्हतं. चारपाच रुपयाचेंच पातळ पण तेहि चार रुपये खर्च करण्यास त्याच्यापाशीं नव्हते. त्याला फार वाईट वाटलं. पण कसंहि झालं तरी आपण आपल्या बहिणीची इच्छा पुरी करणार, असा त्यानें आपल्या मनाशीं निश्चय केला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो गिरणींतील हेडक्लार्क रतिलाल याच्याकडे उसने पैसे मागण्यासाठीं गेला. फार कष्ट पडले त्याला पांच रुपये उसने आणायला! रतिलाल कांहीं केल्या उसने पैसे देईना. आपल्या पुढल्या पगाराला ते पांच रुपये कापून घ्या म्हणूनहि विठूनें त्याला सांगितले. त्याची विनवणी केली. कितीतरी आर्जवं केलीं. त्याच्या पायांसुद्धां पडला, पण व्यर्थ, शेवटीं त्यानें सांगितलें, "शेट, माझ्याकरितां नको तर माझ्या एकुलत्या एक अभागी भिकीसाठीं तरी पांच रुपये द्या! नाहीं म्हणूं नका! परवां तिचा वाढदिवस आहे. फार इच्छा आहे तिची कीं त्या दिवशीं आपण एक सुंदर तलम पातळ नेसावं म्हणून! म्हणून हात जोडून विनंति करतों शेट! माझ्यासाठीं नको तर तिच्यासाठीं— माझ्या भिकीसाठीं मला पांच रुपये द्या!" आणि त्यानें खरोखरच रतिलालच्या पायांवर आपलं मस्तक ठेवलं.

" अरे, तुझ्या भिकीसाठीं पाहिजे होते तर तें अगोदर कां नाहीं सांगितलंस ? पण ही भिकी कोण तुझी ? " रतिलालनें विचारलें.

" माझी बहिण, शेट ! "

" तुझी बहिण ? ती दुपारच्या वेळेस खायला घेऊन येते ती ? "

" होय साहेब ! " आपल्याला शेट आतां खात्रीनें पैसे देतील अशी त्यास बळकट आशा वाटूं लागली.

" मग तिला गिरणींत कामासाठीं कां नाहीं रे ठेवत ? " त्यानें शांतपणानें विठूला विचारलें.

" साहेब, कशाला विनाकारण त्रास ! अगोदरच दुर्दैवी बिचारी ! कां उगाच तिला कामाचा त्रास द्या ! "

" तसं नव्हे ! त्यामुळं तुला थोडीशी पैशाची मदत होईल अन् तिचंहि मन थोडंसं कामांत गुंतेल ! "

" नको साहेब ! घरीं आहे तीच बरी आहे सुखांत ! इथं येऊन या हालअपेष्टांत कां पाडा तिला ! "

" कां ? तिला भीति वाटते कां या मजुरांची ? " त्यानें हांसून विचारलें.

" तसं नव्हे साहेब ! ही गिरण आहे. नाना तऱ्हेचे लोक इथं काम करतात. उगाच कशाला ?

—? तशांत ती साधी, भोळी न्...! "

" त्याबद्दल म्हणालास होय ? बरं आहे ! हे घेऊन जा पांच रुपये ! " असं म्हणून रतिलालनें आपल्या खिशांतून पांच रुपयांची नोट काढून विठूच्या हातावर ठेविली.

मोठ्या आनंदानें विठू घरीं आला. कल्पनातीत आनंद झाला होता त्याला. आपल्या भिकीची इच्छा आपण किती प्रयासानें पुरी करीत आहों याबद्दलचा विचार त्याच्या मनांत येऊन त्यास स्वतःबद्दल आश्चर्य न् अभिमान वाटला. आपल्या प्रेमळ भावानें आपल्यासाठीं एवढे कष्ट करून आणलेलें पातळ पाहून तिला केवढा आनंद होईल याविषयींचे विचार तो घरीं येईपर्यंत त्याच्या मनांत चाललेले होते.

आणि खरोखरच भिकीला तिच्या दादानें आणलेलें तसलं तलम पातळ

पाहून विलक्षण आनंद झाला. ती त्या आनंदांतच आणि दुसऱ्या दिवशीं उगवणाऱ्या आपल्या वाढदिवसाच्या भावी सुखांत समाधानानें जेवून झोंपली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं कामावर जातांना विठू आपल्या बहिणीस म्हणाला, "भिकी, सारं जेवण संध्याकाळसाठींच करून ठेव. माझ्या दुपारच्या जेवणास चटणी–भाकर पुरे होईल! कामावरून आल्यावर आपण दोघे आनंदानें तुझ्या वाढदिवसाचं जेवण जेऊं या!" आणि तो कामावर निघून गेला.

भिकीनें मोठ्या आनंदानें सकाळचीं सारीं कामें उरकलीं, आंघोळ केली आणि आदल्या दिवशीं दादानें आणलेलें तलम पातळ नेसून विठूला दुपारसाठीं चटणी–भाकर घेऊन गिरणींत गेली.

विलक्षण मोहक दिसत होती ती आज! किंचित्काल तिचा विठूसुद्धां तिच्या सौंदर्यानें भांबावून गेला. अशी लावण्यवती भिकी परमेश्वरानें आपणास बहीण म्हणून दिली याबद्दल त्यानें परमेश्वराचे मनांतल्या मनांत शतशः आभार मानले. त्याला आपल्या बहिणीबद्दल अभिमान वाटला. तिला तशा वेषांत पाहून त्याला फार आनंद झाला.

आणि गिरणींतील सारे मजूरहि तिला त्या वेषांत पाहून तिच्या सौंदर्यानें भांबावून गेले. जो तो तिच्याकडे पाहून आपापसांत कुजबुजूं लागला. कुणी कुणी अशी सुंदर बहीण असल्याबद्दल विठूचा हेवाहि करूं लागले. विठूची शिदोरी खाऊन संपेपर्यंत ती तिथें होती. सारे लोक टकमक तिच्याकडे पहात आणि एकमेकांकडे पाहून हंसत.

वेळ होतांच भिकी उठली. रिकामी झालेली थाली व डबा हातांत घेऊन ती घरीं येण्यासाठीं निघाली. तिनें आजुबाजूला साशंकित नजरेनें पाहिलें. समोरच रतिलाल आपल्या खोलीच्या दरवाज्यांत उभा राहून तिच्याकडे पहात होता. तिनें एकदांच तिकडे पाहिलें आणि ती चटकन् पाठ फिरवून घरीं निघाली.

"संध्याकाळीं मी येईन! जेवण वगैरे तयार असूं दे!" जातां जातां विठू तिला म्हणाला. तिनें पुन्हां एकदां मागें वळून तिच्या दादाकडे

पाहिलें. अजूनहि रतिलाल दारांत उभा राहून हांसत असलेला तिला दिसला.

दुपारच्या सुटीनंतर विठू पुन्हां आपल्या कामास लागला. पण आजूबाजूला काम करीत असलेल्या लोकांत कसली तरी कुजबुज चाललेली त्याला ऐकूं आली.

" अरे कृष्णा, आज भिकीचा रंग कांहीं निराळाच दिसत होता ! " कुणीतरी म्हटलं.

" अरे असणारच. आज म्हणे तिचा वाढदिवस आहे ! " दुसरा म्हणाला.

" तिचा कसला आला आहे वाढदिवस ? रतिलालचा असेल ! दुसरं काय ! " तिसऱ्यानें मध्येंच म्हटलं.

" रतिलालचा ! त्याचा हिच्याशीं काय संबंध ? "

" अरे त्याचाच खरा संबंध आहे ! " दुसऱ्यानें उत्तर दिलें. नाहींतर उगीच त्याने विठूला तिच्या पातळासाठीं पाच रुपयांची नोट झटकन् काल काढून दिली ? "

अशा आणि इतर कितीतरी गोष्टी त्यांच्यांत चालल्या होत्या. प्रत्येक वाक्यानिशीं विठूच्या पायाची आग मस्तकाला पोंचत होती. त्याचा राग अनावर झाला. त्याने चटकन् उडी मारली आणि त्यांतील एकाची मानगुटी पकडली.

" बोल ! काय म्हणालास, रतिलालचा असणारच संबंध माझ्या भिकीशीं ! बेशरम मनुष्या, भाग्य लागतं बरं तिच्याशीं नुसतं बोलायला ! पुन्हां बोल तर खरं खूनच पाडला म्हणून समज ! "

" काय पण साळसूदपणाच्या गोष्टी बोलतो आहे ? फार अभिमान बाळगतो आहे आपल्या बहिणीबद्दल ! जा म्हणे घरीं आणि पहा आपल्या आवडत्या बहिणीचे चाळे ! " कुणीतरी कुजबुजला.

विठूच्या अंगाची लाही लाही झाली. सारखा चरफडत होता तो. आपल्या प्रेमळ अन् सात्विक बहिणीची अशाप्रकारें बेअब्रू केल्याबद्दल प्रत्येकाचा चांगला समाचार घ्यायचं तो अगदीं ठरवत होता. आपल्या

विनंतीवरून रतिलालशेटनीं दिलेल्या पाच रुपयाचा आपल्या बहिणीच्या सौंदर्याशीं रतिलालचा संबंध लावल्याबद्दल त्यानें शिव्यांची लाखोली वाहिली. त्याच्या तोंडाचा पट्टा एकसारखा चालू होता. भिकीसारख्या आपल्या प्रेमळ बहिणीची केवळ तिच्या तारुण्यामुळ न् लावण्यामुळं अशी विटंबना व्हावी ही कल्पनाच त्याला सहन होईना. केव्हां एकदां या पापी वातावरणातून आपण बाहेर पडतों आणि घरीं जाऊन भिकीशीं चार प्रेमाचे शब्द बोलतों असं त्यास होऊन गेलं.

वेळ होतांच आनंदानें तो घरीं निघाला. डोक्यांत आतांच गिरणींतील त्याच्या सवंगड्यानीं त्याच्या भिकीबद्दल उच्चारलेले विटंबनेचे शब्द त्याच्या डोक्यांत थैमान घालत होते. जसजसं घर जवळ येऊं लागलं तसतसा त्याला झाल्या गोष्टींचा विसर पडूं लागला आणि भिकीची मूर्ति डोळ्यासमोर उभी राहिली.

आपल्याला लाबून येतांना पाहून धांवतच येईल माझी भिकी अन् म्हणेल, दादा, किती वाट पाहूं रे तुझी? चल ना लवकर.

घर दृष्टीपथांत येतांच किंचित् धांवतच तो निघाला. पण त्याला दरवाज्यांत भिकी दिसली नाहीं. त्याची थोडीफार निराशाच झाली.

‘ असेल कामांत पानं वाढायच्या ! ’ असा मनाशीं विचार करीत त्यानें दार ढकललं अन् हांक मारली, “ भिकी ! ”

आतील दृश्य पाहातांच तो दरवाज्यांतच मूर्च्छित होऊन पडला.

आंत खाटेवर त्याची प्रेमळ, सात्विक बहीण नवीन पातळ नेसून अन् रतिलालच्या गळ्यांभोंवतीं प्रेमानं हात टाकून पाठमोरी बसलेली होती आणि रतिलाल तिच्या चेहऱ्याकडे पाहून हांसत होता.

आशा—प्रमोद : ता. २६।११।३९

---

## १३ : : जीविताचीं प्रमेयें

आपटे मास्तरनीं वर्गांत पाऊल टाकलें आणि वर्गांत सर्वत्र कुजबूज सुरू झाली. मास्तरनीं हातांतील पुस्तक टेबलावर ठेवलें व खुर्ची पकडली. पण तिच्यावर बैठक मारण्यास त्यांस चमत्कारिक वाटूं लागलें. त्यांनीं समोरच असलेल्या टेबलाचा किंचित्सा आधार घेतला आणि जमिनीवर डाव्या पायांतील बुटाचें टोंक टेंकून उजवा पाय तसाच लोंबकळत ठेवला. नवीनच नेमणूक झालेल्या मास्तरांची नेहमींचीच पद्धत असते ती. तशांत मुलींची शाळा व सहाव्या वर्गावर पहिलाच तास. मधुकर जात्याच भिडस्त आणि लाजाळू. यंदाच बी. ए. झालेला आणि ताबडतोब मुलींच्या शाळेंत मास्तर म्हणून नेमणूक. तो तसाच कांहीं वेळ उभा राहिला. पांचसहा मिनिटें तो स्तब्धच होता. तेवढ्या अवधींत त्यानें कितीदांतरी खिशांतून हातरुमाल काढून तोंडावरून फिरवला असेल. त्यानें सर्व वर्गावर चटकन् नजर फिरविली आणि अधिक वेळ घालविण्यांत अर्थ नाहीं असें वाटूनच कीं काय त्यानें बोलण्यास सुरवात केली.

" नाऊ हिअर! कसला पिरियड आहे आज ? " सर्व वर्गाला उद्देशून तो प्रश्न असल्यामुळें त्याने उत्तराची अपेक्षा प्रत्येक मुलीकडून केली आणि त्यामुळें त्यानें सभोंवार नजर फिरविली.

" मास्तर, आज जॉमेट्रीचा तास आहे. " कुठल्याशा कोपऱ्यांतून मंजुळ आवाज आला. मधुकरनें त्या दिशेकडे पाहिलें. इवलीशीच कळी

त्याठिकाणीं उमललेली त्याच्या नजरेस पडली. नलिनीच्या चेहऱ्यावर हास्य उमललें आणि त्याचें दिग्दर्शन गालावर पडलेल्या नाजुक खळींत आणि उत्तर देऊन बसतांना मानेला दिलेल्या गोड वळशांत अंतर्धान पावलें. मधुकरही किंचित् हंसला. सारे डोळे नलिनीकडे एकवटले गेले.

" बरं आहे, मग मी घालतो तो प्रॉब्लेम सोडवा. " असें म्हणून मधुकरानें फलकावर आकृति काढली आणि तो प्रॉब्लेम सोडविण्यास सांगितले.

मुलींनीं अभ्यासास सुरवात केली. मास्तर इकडून तिकडे येरझारा घालीत होते. मनांत तेहि एकादा प्रॉब्लेम सोडवीत असावेत.

" मास्तर ! " टक् टक् अशा आवाजानंतर शब्द उमटले.

मधुकरानें तिकडे पाहिलें आणि ते त्या मुलीकडे गेले.

" काय पाहिजे ? "

नलिनीच्या ओठांवर आलें होतें प्रश्नाचें खरें उत्तर. पण कुशल कारागीर ज्याप्रमाणें आपलं सारं कौशल्य आपण बनविलेल्या कृतींत उतरवितो त्याप्रमाणेंच नलिनीनें मास्तरच्या " काय पाहिजे ? " या प्रश्नाचें उत्तर आपल्या भावकृतींत उतरविलें.

" मास्तर मला एक डिफिकल्टी विचारायची आहे. " तिनें गोड आवाजांत लडिवाळपणानें मान किंचित् कलती ठेवून, मृदु हास्य करीत विचारलें.

" कोणती ? विचारा कीं ? "

नलिनीनें आतांच मास्तरनीं घातलेल्या प्रॉब्लेमची आकृति काढून कागद मधुकरास दाखविला. मधुकरानें तिच्याकडे पाहिलें. तिनेंहि मधुकराकडे नजर रोखिली. तिच्या नजरेंत जादुगाराची करामत सांठविलेली होती. मधुकर विचारशून्य बनला. त्याला आपण आतांच मुलींना घातलेल्या प्रॉब्लेमचें स्मरणसुद्धां झालें नाहीं. त्यानें तो सोडविण्यासाठीं नलिनीकडे पेन्सिल मागितली. ती घेत असतांना त्याच्या बोटांचा तिच्या हातास स्पर्श झाला. त्याचक्षणीं एका अननुभूत संवेदनेचा उगम झाल्याचा एकमेकांना भास झाला. मधुकरानें प्रॉब्लेम सोडविला आणि कागद नलिनीकडे परत देत असतां " समजलं ना ? " एवढेंच तो म्हणाला.

"समजलं मास्तर. थँक यू!" असे म्हणून नलिनी हसली.

मधुकराने कसाबसा एकदाचा तो तास संपवला आणि त्या वर्गांतून पलायन केलें. नलिनीच्या दर्शनानें आणि तिने आपल्याशीं दाखविलेल्या लडिवाळपणानें त्याची आज फारच चमत्कारिक स्थिति झाली होती. त्या दिवशींचे शिल्लक राहिलेले तास त्यानें मोठ्या शिकस्तीने संपविले.

मधुकर आपटे मुळचा कोंकणांतला. घरची गरिबीची स्थिति पण आपल्या हुषारीमुळे त्यानें त्या गरीब स्थितींतही बी. ए. चा कोर्स पुरा केला. त्याला मास्तरच्या नोकरीचा फार तिटकारा. आपण वकील व्हावें आणि आपल्याच गावीं वकिलीची सनद काढून प्रॅक्टीस सुरू करावी असे त्याच्या मनातून फार होते. एवढेच नव्हे तर मास्तरची नोकरी शक्य तोंवर करणार नाहीं, अशीही त्याने मनाशीं योजना केली होती. वर्षानुवर्षे तेच भूमितीचे धडे, तींच बीजगणिताचीं आणि अंकगणिताचीं उदाहरणें व तेंच सदासर्वदा. एकदां उत्पन्न झालेलें शालेय वातावरण. या सर्वांचा त्याला फार तिटकारा होता. पण 'योजितो नर एक कांहीं, दैव योजी दूसरें' आशातली त्याची गत झाली. आणि गरिबीमुळे त्याला वकिलीच्या टर्म्स भरतां आल्या नाहींत. परंतु त्याचे दैव बलवत्तर असल्यामुळें, दोन महिन्यांच्या अवधींत त्याची वरील मुलींच्या शाळेत गणिताचे मास्तर म्हणून नेमणूक झाली. नोकरी मिळाली म्हणून त्याला आनंद झाला खरा पण तो दुःखमिश्रित होता.

लहानपणापासून त्याला वाचनाची आणि लिहिण्याची फार हौस. तो कॉलेज-शिक्षण घेत असतानाच त्याच्या कितीतरी गोष्टी निरनिराळ्या साप्ताहिकांतून प्रसिद्ध झाल्या होत्या. वरील शाळेत नेमणूक झाल्याच्या दुसऱ्याच दिवशीं त्याची 'त्याग' ही गोष्ट प्रसिद्ध झाली होती. परंतु कां कुणास ठाऊक ती गोष्ट त्यानें 'मधुकर' या टोपण नांवाने प्रसिद्ध केली.

नेहमींप्रमाणें त्याचा शाळा—मास्तरचा व्यवसाय चालला होता. त्याचें त्यांत फारसें लक्ष नसे—नव्हे त्यांत त्याला एक प्रकारची रुक्षता वाटे. पण घरची गरीब—स्थिति लक्षांत घेऊन त्याने मोठ्या नाइलाजानें आपला व्यवसाय व्यवस्थितपणें चालू ठेविला होता. एवढें जरी होतें तरी त्याच्या

व्यवसायांतली रुक्षता नाहींशी करून आपल्या प्रेमळ सहवासाचें क्षणिक सौख्य देणारी एक व्यक्ती त्या शाळेत होती—आणि ती म्हणजे नलिनी परांजपे. मधुकरास शाळेतील वातावरणांत भासणारा रुक्षपणा ती आपल्या दर्शनानें व आकृतीनें नाहिंसा करी, एवढेंच नव्हे तर शाळेंतील एकंदर अध्यापकवर्गांत आणि मुलींतसुद्धा आनंदी वातावरण निर्माण करणारी ती एक कलिका होती. प्रत्येक अध्यापकाचा तिच्यावर फार लोभ. तीं जात्याच हुशार मुलगी-घरची श्रीमंती आणि त्यांतच विधात्यानें लावण्याचा साज तिच्यावर चढवलेला. नाजुक जिवणी, मोहक चेहरा, चाफेकळीसारखे नाक, मानेवर रुळणारा सैलसा आंबाडा, त्यावर एकच गुलाबाचें फूल, कानात वाऱ्याच्या नाजुकशाहि स्पर्शानें डोलणारं ईअर रिंग्ज, काळभोर टपोरे डोळे, धनुष्याकृति भुंवया, हंसतेवेळीं उजव्या गालावर पडणारी लहान शीच खळी व त्याच्याच वरच्याभागीं ती खळी खुलून दिसण्याकरितांच जणूं काय निसर्गानें निर्माण केलेला काळा तीळ, भरीव वक्षःस्थळ आणि एकंदर सौंदर्याला शोभेशी रेखीव व बांधेसूद शरीराची सजावट, या सर्व गोष्टी कोणाच्याहि मनांत आपलेपणाची भावना उत्पन्न करीत. इतकेंहि असून सौजन्याची, शालिनतेची ती सोज्वळ मूर्ति होती. पहिल्याच दिवशीं मधुकराच्या मनात तिच्याविषयीं आपलेपणाची भावना उत्पन्न झाली. आणि—

तो त्याचा शाळेतील दुसरा आठवडा होता. सहावीच्या वर्गांत शिरतांना मधुकरास एक प्रकारचा हुरूप येई—नव्हे, तो त्या वर्गांत जाण्यास नेहमींच उत्सुक असे. शाळामास्तरची नोकरी करण्यांत त्याला कमीपणा वाटंत होता. पण वर्गांत नलिनीची शात, हंसरी, मोहक मूर्ति दृष्टीस पडतांच त्याचे सारे विचार पार बदलून जात. त्याला वाटे नलिनी शाळेंत असेतोंपर्यंत तरी शाळेची नोकरी सोडूं नये. त्याच्या मनात कितीदातरी येई कीं प्रिन्सिपॉलनी आपले सारेच तास सहावीवरच ठेवले असते तर फार मजा झाली असती. उत्कट प्रेमाची भावना व चिरंतन सहवासाचें सौख्य यांनीं संघटित केलेले विचारहि केव्हां केव्हां त्याच्या मनांत प्रवेश करीत.

त्या दिवशीं शाळेंतील ऑफिसात प्रिन्सिपॉलशीं कांहीं बोलायचें असल्यामुळें स्टेशनवर यावयास मधुकरास थोडासा उशीर झाला. एक गाडी

चुकल्यामुळें, पुढची गाडी स्टेशनमध्यें येतांच त्यानें त्यांत प्रवेश करून खिडकीजवळची जागा पसंत केली. त्याचवेळीं त्यानें बाहेर पाहिलें तों नलिनी त्याच्याच डब्यांत शिरत होती. त्याला थोडंस आश्चर्य वाटलें.

नलिनीने मास्तरांस नमस्कार केला, किंचित् हंसली व त्यांच्याच समोरील बाकांवर तिनें बैठक मारली. गाडी चालू झाली.

" मास्तर, तुम्हांला एक डिफिकल्टी विचारायची आहे ! " नलिनीनें बालाच्या मानेनें व त्यांच्याकडे पहात प्रश्न केला.

" कसली डिफिकल्टी ? विचारा कीं ? " मधुकरनें उत्तर दिलें.

" डिफिकल्टी अभ्यासाविषयीं नाहीं. बाहेरचीच तुमच्याविषयीं आहे. "

" हं ! " मधुकरास स्वत:विषयींच्या डिफिकल्टीबद्दल आश्चर्य वाटलें.

" मास्तर, कालच्या ' सागर'च्या अंकांत आलेली तुमची ' त्यागी ' नांवाची गोष्ट मी वाचिली. फारच चांगली आहे. विशेषत:नीलेचें स्वभावरेखाटन तुम्ही फारच कुशलतेनें केलें आहे. मला तुमच्या गोष्टी फार आवडतात." नलिनी हंसली. आणि तिनें चोरट्या नजरेनें मधुकरकडे पाहिलें.

" माझी ? अन् त्यागी नांवाची गोष्ट ? मी कधींच गोष्टी लिहीत नाहीं !"

" मास्तर मला सारं समजलं आहे. आतां खोटं बोलून विनाकारण फसविण्यांत काय अर्थ ! मास्तर, तुमच्या पूर्वीच्या गोष्टी मला वाचण्यास मिळतील कां ? "

मधुकर चमकला. त्याला नलिनीनें आपल्या कांहीं गोष्टी वाचल्या व त्या तिला आवडल्या याबद्दल अंतर्यामीं आनंद झाला. त्यानें नुसतं 'हो' म्हटलं.

" मग कशी काय आवडली ती गोष्ट ? "

" मघांशीच सांगितलं ना फारच छान आहे म्हणून. मग मी उद्यां येऊं का तुमच्या घरीं ? "

" जरूर. " त्यांनीं एकमेकांकडे पाहिलें अन् ती हंसलीं.

स्टेशन आलें. मधुकर उतरला. नलिनीहि उतरली. मधुकर गेटच्या बाहेर पडेपर्यंत नलिनी एकसारखी त्याच्याकडे पहात होती.

" किती चांगला मधुकर ! " नकळत तिच्या तोंडून उद्गार बाहेर पडले आणि त्या विचारांतच ती नेहमींप्रमाणें सेकंडक्लासच्या डब्यांत जाऊन बसली.

कालगति चालूच होती. निसर्गाचें यंत्र सुरूच होतें. चराचर वस्तूंची क्षणभंगूर जीवन–यात्रा धिमेपणानें आपला मार्ग आक्रमण करीत होती पण मधुकराच्या आणि नलिनीच्या विचारांत, आचारांत, वर्तणुकींत आणि बोलण्यांत फारच रूपांतर झालें होतें. नव्हे त्या दोघांचे आचारविचार, चालचालणूक एकरूप झाली होती. आणि त्यामुळेंच 'आपण वकिलीस गेलों नाहीं, शाळेंत मास्तरकी पकडली, बरं झालं' असेंहि विचार नलिनीच्या सहवासानें त्याच्या मनांत घोळूं लागले.

दोन महिन्यानंतरची गोष्ट. मधुकर शाळेंत जाण्याची तयारी करीत होता व त्यावेळीं पोष्टमननें 'जीवन'चा नवीन अंक आणून दिला. त्यानें कपडे केले आणि अंक चाळला. त्याची गोष्ट त्याला कुठंच सांपडेना पण 'अर्पण' या शीर्षकाखालीं आपल्या नांवानें प्रसिद्ध झालेली गोष्ट त्यानें पाहिली. त्याला फार आश्चर्य वाटलें. 'कोणी बरं ही गोष्ट लिहिली अन् माझ्या नांवावर प्रसिद्ध केली' त्यानें विचार केला आणि चटकन् त्याच्या नजरेसमोर नलिनीची प्रेमळ, हंसतमुख अशी मूर्ति उभी राहिली.

"मग नलिनीहि गोष्ट लिहिते तर?" तो म्हणाला. आणि घाई असतांनासुद्धां त्यानें ती गोष्ट लवकर लवकर वाचून काढली.

शाळेंत मोठ्या आनंदानें तो गेला. सहावीवर त्याचा त्या दिवशीं दुसरा तास होता.

तास चालू असतांच, मधुकर नलिनीकडे गेला व शाळा सुटल्यावर आपणांस भेटण्याबद्दल त्यानें तिला सांगितलें.

"काय ग नलिनी? कसलं काम?" कुठूनतरी आवाज आला.

"अग कुसूम, असेल एकादा भूमितींतील प्रॉब्लेम?"

"नाहीं ग वेडे, जीवितांतील एकादा प्रॉब्लेम सोडवायचा असेल." तिसरा ध्वनि उमटला.

"अय्या! नलिनी, बरीच आहेस कीं ग!"

"ए नलिनी! आमचा बाई परीक्षेंत वशिला लाव हं!" व प्रत्येक मुलगी नलिनीकडे आश्चर्यानें, कुतूहलानें व थट्टेनें पाहूं लागली. नलिनी शरमिंधी झाली. पण आनंदाच्या लहरी अंतःकरणांत उचंबळत होत्या.

शाळेची शेवटची घंटा झाली व सर्व मुली बाहेर आल्या. नलिनीनें आजूबाजूला पाहिलें. मनाची खात्री करून घेतल्याचा अविर्भाव केला आणि तडक घरची वाट धरली. शाळा सुटल्यावर मधुकर मास्तरनीं आपणांस भेटण्यास सांगितल्याची तिला पूर्ण जाणीव होती.

शाळेचे सर्व तास संपताच मधुकर आपल्या खोलींत येऊन नलिनीची वाट पहात बसला. पंधरा मिनिटें होऊन गेली तरी नलिनी येत नाहीं, असें पाहून तो बाहेर आला. पाहतों तों सर्व मुली घरीं गेलेल्या. त्याला नलिनीचा राग आला पण नजरेसमोर नलिनीची प्रेमळ, हंसरी व सुंदर मूर्ति येताच तो पार मावळला. तो किंचित् आपल्याशींच हंसला आणि त्यानें नलिनीच्या घरची वाट धरली.

बंगलीच्या कंपाऊंडचे फाटक आंत शिरत असतानाच नलिनी धांवतच तिकडे गेली. आपटेमास्तरना–नव्हे तिच्या मधुकरला पाहून–तिला जास्त आनंद झालेला दिसला.

"फसविलं म्हणून राग नाहीं ना आला?" नलिनीनें हंसत मान थोडीशी कलती करून प्रश्न केला.

"कां म्हणून?" मधुकराचा राग केव्हांच नाहींसा झाला होता.

"तुम्ही सागितलं असतां, मी शाळा सुटल्यावर तुम्हांस भेटलें नाहीं म्हणून."

"तसं कसं? तुमच्यावर माझा फोर्स होता कां?"

"फोर्स नव्हता अन् होता व आतां आहेहि" नलिनीने तिरप्या नजरेनें मधुकरकडे पहात हंसत म्हटलें.

"आणि मी भेटलें नाहीं तर तुम्ही माझ्या घरीं येणार, ही मला पूर्ण खात्री होती अन् ती खरीहि झाली."

"नलिनी—!" मधुकरच्या तोंडून एक वचनी शब्द बाहेर पडले.

"मधुकर—!" त्यास प्रत्युत्तर मिळालें.

"नलिनी, कालच्या 'जीवन' मधील अर्पण गोष्ट तूं माझ्या नांवावर कां लिहिलीस?"

" कुणाच्या नांवावर ? तुमच्या ? माझी गोष्ट मी माझ्या आवडत्या टोपण नावानें प्रसिद्ध करूं नये वाटतं !" ती हसूं लागली.

" तें कसं ?"

" मधुकर तुम्ही भूमितींतील प्रमेयें चटकन सोडवितां अन् तारुण्याच्या भर अमदानींत असतांना तुम्हांस जिवितांतील प्रमेयें मधुकर—!" नलिनीनें चटकन् मधुकरचा हात पकडला आणि तिनें मान खालीं घातली.

" नलिनी, नलिनी इकडे पाहा ! शाळामास्तरला भूमितींतील प्रमेयें व प्रॉब्लेम सोडवतां येनात म्हणून त्याला जीवनामधील प्रमेयें सोडवतां येणार नाहींत. तीं सोडविण्यास त्यास एकाद्या कुशल स्त्रीशिक्षकाचीच मदत घ्यावी लागते. आणि म्हणून तुझ्या मदतीनें मला तीं जितक्या सुलभरीतीनें सोडवता येतील, तेवढीच तीं तुझ्या मदतीशिवाय कठीण होतील. नलिनी, भूमितीमधील प्रॉब्लेम सोडविण्यास मी तुला मदत करतों, मग जीवनाची प्रमेयें सोडविण्यास तुझा मला चिरकाल सहवास लाभेल कां ?" मधकरानें तिचें दोन्ही हात पकडले. नलिनी त्याच्या बोटांशीं आपल्या नखांनीं चाळे करीतच होती.

" मधुकर, चला आपण बाहेर फिरायला जाऊं." नलिनीच्या या बोलण्यातच मधुकरास त्याच्या प्रश्नाचें उत्तर सांपडलें.

दोघेही बाहेर निघालीं. मधुकराच्या जीवितांतील प्रमेयांचा बराचसा भाग साहजिकपणें सुटला गेला.

दुसऱ्याच दिवशीं मधुकरनें आपला राजिनामा पाठवला. सध्यां तो फोर्टमधील एका कंपनींत बड्या ऑफिसरच्या जागीं काम करतो आहे.

शाळामास्तरच्या नोकरींत कमीपणा मानणारा मधुकर नलिनीची आठवण होतांच व तिची प्रेमळ, शांत, हंसरी मूर्ति नजरेसमोर येतांच, त्या नोकरीची धन्यता लक्षांत घेऊन नकळत तीस प्रणाम करतो. नलिनीला समजतांच ' इश्श ! काय !' असें म्हणून त्याला भानावर आणते. कारण जीविताचीं प्रमेयें सोडविण्यास स्त्रीशिक्षक त्याला त्याच स्थळीं सांपडला आणि म्हणूनच त्याचें जीवन सुखकर झालें.

चित्रा : ता. १४।९।३७

## १४ : : ओळख

पंजाब–मेल स्टेशनांत उभी होती आणि विनय आपल्या ताईशीं बोलत प्लॅटफॉर्मवर उभा होता. ताईच्या प्रेमळ सहवासांत विनयनें सुखदुःखाचे सातआठ दिवस कसे तरी घालविले. सुखदुःखाचे म्हणण्याचें कारण एवढेंच कीं, दिपवाळीचे आनंदाचे दिवस इंदूताईबरोबर प्रेमानें गप्पागोष्टी करण्यांत व मुंबईची मजा पहाण्यांत घालवायचे असें मनाशीं ठरवून, ताईच्या खास व प्रेमाच्या आमंत्रणावरून विनय मुंबईस आला. चारपांच दिवस मजेंत घालवले, सगळं खरं, पण आज निघतांना कालपासून मनाला लागलेली हुरहुर त्या सुखाचा पुरा वाटेकरी होण्यास विनयला देईना. काल सकाळींच वडिलांची घरीं निघून ये म्हणून तार आली, त्यावेळींच ताई-बरोबरच्या सहवास–सौख्याचा व मागून अंतःकरणास अननुभूत आनंद देणाऱ्या स्मृतींचा एकदमच शेवट झाला असें त्यास वाटलें. मनाचा ताबा संशयानें आणि भीतीनें घेतला, डोक्यांत भलतेच विचार येऊं लागले व मुद्रेवरील प्रसन्नतेची जागा संशयमिश्रित भीतीनें पकडली. ही गाडी उद्यां दुपारीं ग्वाल्हेरास पोंहचेल आणि त्यावेळींच आपणांस आपल्या आतां-पर्यंतच्या आकांक्षांना बळी देऊन, वडिलांनीं आपल्या मनाच्या योजनेप्रमाणें पसंत केलेल्या मुलीबरोबर आयुष्याचा बिकट मार्ग काळवंडलेल्या चेह-

ऱ्यानें व निराशेने होरपळून निघालेल्या अंतःकरणानें काढावा लागणार हें भेसूर चित्र त्याच्या डोळ्यांसमोर उभें राहिलें. बाजूलाच उभ्या असलेल्या गाडीच्या एंजिनकडे त्याचें लक्ष गेलें, व क्षणभरच मनास भास झाला कीं, आशा–निराशेच्या झगड्यांत मरणाच्या दाराशीं नेण्यास खरोखरच हा कोणीतरी अक्राळविक्राळ रूप धारण केलेला यमदूतच असावा.

'पण, भाई, तुझ्या मनांत नसेल करायची, तर तसं तूं बाबानां उघड सांग. घाबरूं नकोस, भिऊं नकोस. मीहि इकडच्यांकडून बाबानां पत्र पाठवतें.' ताईच्या शब्दांनीं मनास थोडासा धीर आला.

ताई, वडिलांच्या अपरोक्ष माझं मन धीरोदत्त बनतं. पण वडिलांच्या नजरेला माझी नजर भिडली कीं त्याच मला गोगलगाय बनावं लागतं. बाबानीं या बाबतींत माझा विचार घ्यावयास पाहिजे होता.'

'पण तेवढा त्यांना विचार असेल तर ना?'

'विचार नसला म्हणून काय झालं, ताई? लग्न मी करणार म्हणजे मग माझ्या पसंतीप्रमाणे त्यांनीं मुलगी ठरवायला नको का?'

'अरे जुने पुराणमताभिमानी बाबा! त्यांना एवढं कुठं ज्ञान आहे? त्यांचीं लग्नें त्यांच्या वडिलांनींच आपापल्या पसंतीप्रमाणेंच केलीं ना?—अन् माझं!' ताईला फार वाईट वाटलें. विनयलाही तिच्याकडे पाहून कससंच झालं. बाबाचा रागही आला, पण करणार काय?

इतक्यांत आगगाडीने सुटल्याबद्दलचा इशारा दिल्यामुळें विनय आंत जाऊन बसला, व ताईकडे सस्मित नजरेनें पहाण्याचा प्रयत्न करीत असतांच गाडीला धक्का मिळाला.

'भाई, धीर सोडूं नकोस! आपल्या मनाप्रमाणें वाग व उत्तर पाठव.' एवढेंच ताईनें उच्चारलेले शब्द त्याच्या कानावर आले.

मुंबईतील चारसहा दिवसांचें गतायुष्याचें चित्र पुसटलें गेलें आणि ग्वाल्हेरमधील त्याच्या घरांतील दिवाणखान्यांत वडिलांच्या देखरेखेखालीं त्याच्या भावी आयुष्याचें चित्रित केलें जाणारें भेसूर चित्र त्याच्या नजरेसमोर उभे राहिलें. बोरीबंदरच्या बाहेर गाडी असतांनाच त्याला मुंबई मागें पडली व आतां एकदोन मिनिटांत ग्वाल्हेरचें भव्य स्टेशन येईल असा भास

झाला. तो काव-याबाव-या नजरेनेंच खिडकीबाहेर पहात होता. डोक्यांत एकच विचार. 'नीला–आणि–आणि वडिलांनीं माझ्याकरितां ठरवलेली माझी भावी वधू!' विचाराबरोबर नीला त्याच्या मनःचक्षूसमोर उभी राहिली.

खरोखरच नीला सुंदर होती. विधात्यानें तिची शरीरयष्टी अशा रीतीनें बनविली होती कीं, तिच्या देहलतेकडे पहातांच एकादा अरसिकसुद्धां तिच्या सहवासांतील काल्पनिक चित्र आपल्या मनाच्या पडद्यावर विचाराच्या कुंचल्यानें चितारूं शकला असता. तिचें मुखमंडळ इतकं शांत, सस्मित व सुंदर होतें कीं, एकाद्या कवीनें प्रेमवेडाच्या लहरींत तिच्या मुखावरच एकादें खंड काव्य रचिलें असतें. मानेवरील रुळणारा सैलसा अंबाडा, त्यावर खोचलेलें एकच गुलाबाचें फूल, नजरेंतील तरलता, मोहक जिवणी,—सारें सारें एका क्षणांत तिच्याविषयीं आपलेपणा उत्पन्न करी. त्याला सारें आठवलें. हृदयांतील खोल कप्प्यांत जाऊन राहिलें. पण भवितव्यतेचीं भेसूर चित्रें डोळ्यांपुढून हालेनात. त्याला नीलेची ओळख झाल्यावेळचा प्रसंग आठवला, आणि त्याबरोबरच आपल्या हृदयावर तिने त्यावेळीं चितारलेलें स्वतःचें रमणीय चित्र थोडं फार सरकल्याचा त्याला भास झाला.

त्यावेळीं तो बी. ए.च्या परीक्षेला बसला होता. परीक्षा आटोपल्याबरोबर, त्याच्या जिवलग मित्राचें आपल्या गांवीं घरीं येण्याबद्दल अगत्याचें आमंत्रण आल्यावरून आणि घाटावरची बाजू त्यानें पाहिली नसल्यामुळें, त्यानें बेळगांवास आपल्या मित्राकडे जाण्याचें ठरविलें आणि त्याप्रमाणें तो निघाला.

पुणें स्टेशनवर, एक दक्षिणी तरुणी एका वृद्ध इसमाबरोबर त्याच्याच डब्यांत तेथें थोडीशी जागा असलेली पाहून चढली. 'स्त्रीदाक्षिण्यामुळें' म्हणा अगर 'आंतर कोऽपि' हेतूनें म्हणा, विनयानें आपल्या समोरच्या बांकावर ठेवलेलें आपलें सामान काढलें व त्यांना बसावयास जागा दिली.

वृद्ध इसमानें 'Thank you' म्हटलें आणि हास्य वदनानें विनय-

कडे पाहिलें. विनयनें त्याच्याकडे पाहिल्यासारखें केलें व तोहि हंसला. त्या वृद्धाशेजारींच विनयसमोर ती तरुणी बसली होती.

'फार उपकार झाले, नाहीं तर हाल विचारूं नका.'

'त्यात उपकार कसले? प्रवासांत अडचणीच्या वेळीं एकमेकांस मदत करणें प्रत्येकाचें कर्तव्य आहे.'–(पण, वेड्या विनया! ती तरुणी बरोबर नसती तर!— )

'कुठें निघालात?' वृद्धानें साहजिकच विचारलें.

'बेळगांवास!'

'आपली आप्तमंडळी तिकडे रहातात वाटतं?'

'नाहीं, माझा एक मित्र तिकडे रहातो. त्यानें बोलावलं होतं एकदां आपल्या घरीं. परिक्षा आटोपली, म्हटलं जावं त्याच्याकडे म्हणून निघालों'

'कुठल्या बी. ए. च्या परिक्षेला बसलां आहां?'

'हो.'

'कुठल्या कॉलेजांत होतां?'

'विल्सन.' यावेळीं विनयनें त्या तरुणीकडे पाहिलें. जणूं काय ती कुठच्यातरी कॉलेजांत जाते कीं काय या संशयाचें त्याला तिच्याकडून निरसन करून घ्यावयाचें होतें.—आणि त्या प्रश्नाचा उलगडा त्याला लवकरच झाला.

'ही माझी मुलगी नीला. झेविअर कॉलेजांत असते.' नीलेने खालीं मान घालून वरच्या नजरेनें विनयकडे पाहिलें.

'कुठल्या क्लासांत आहे!'

नीलेने आपल्या वडिलांची वाट पाहिली नाहीं. विनयशीं बोलायला, त्याची ओळख करून घ्यायला हीच संधी बरी आहे असें वाटून तिनें आपणच त्या प्रश्नाचें उत्तर दिलें.

'मी प्रिव्हीयसला बसलें आहें.'

'रिझल्टसुद्धां लागला तिचा. सेकंड क्लास मिळाला.' वृद्धानें मध्येंच आपलें तोंड घातलें.

'वा, फार छान! आतां इंटरला काय घेण्याचा विचार आहे?'

‘ लॉजिक घेईन म्हणतें. ’

‘ मॅथेमेटीक्स् कां नाहीं घेत ? परिक्षेंत क्लास मिळवायला फार त्रास पडत नाहीं. तुम्हांला त्याचें कांहीं नाहीं म्हणा ! ’

‘ कां ? ’ नीलेनें तिरप्या नजरेनें विनयकडे पाहात म्हटलें.

‘ कां म्हणजे ! सेकंड क्लास मिळालेल्या मुलींना कठीण काय आहे ? ’

‘ तशासाठीं म्हणून नव्हे ! पण मला मॅथेमेटिक्स्‌ची आवड नाहीं, भारी कठीण आहे असें वाटतं. ’

‘ सेकंड–क्लास तर मिळविला !—आणि कठिण म्हणतां ? ’

‘ तुम्ही काय घेतलं आहे बी. ए. ला ? ’

‘ मॅथेमेटिक्स् ! ’

‘ म्हणूनच वाटतं तो विषय घेण्याचा आपण आग्रह करितां ! आणि मग तुम्हांस लॉजीकचीं पुस्तकं माहीत नसतील तर ? ’ नीलेनें हंसत हंसत प्रश्न केला.

‘ कां ? तुम्हांस माझा अभिप्राय पाहिजे कीं काय ?

‘ हो, तसं म्हटल तरी चालेल. कोणतीं पुस्तकं वाचावीं ? ’

‘ जनरली मुलांनीं मेलॉन् आणि मेलॉनीचीं पुस्तकें वाचावीं, पण परिक्षा पास व्हायला मला वाटतं त्रिवेदी व बानर्जीचे पुस्तक सफीशियंट आहे. तरी पण तुमच्यासारख्या सेकंड–क्लास करीयरच्या मुलींनीं पहिलीं दोन्ही पुस्तकें वाचावयास हरकत नाहीं. न जाणों फर्स्ट–क्लासही मिळेल. ’

‘ अहाहा, काय पण स्तुति चालली आहे माझ्या हुशारीबद्दल ! जणूं काय आपण एक ऑर्डीनरी स्टुडंट ! ’ असे म्हणून नीलेने आपल्या मानेस एक गोडसा लटका वळसा दिला.

इतक्यांत मिरज स्टेशन आलें. चहावाल्यांची वर्दळ सुरू झाली.

‘ चहा घ्यायला येतां ? ’

‘ नको. कशाला ?—अन् आम्ही खालीं उतरून गाडी सुटली तर ! ’ नीला हंसली.

‘ कांहीं घाबरूं नका तुमच्या वडिलांबद्दल ! आणि तुमच्याबद्दल ! मी तुम्हांस नेऊन पोंहचवीन, मग तर झालं ? ’

आतां नीलेचा नाइलाजच होता.—अन् इच्छाही होती. विनयबरोबर चहा प्यायला जाण्याची. विनय गाडीच्या बाहेर आलेला पाहून, नीलाहि खालीं उतरली.

'बाबा तुम्हांस पाहिजे चहा? आणूं एक कप्?'

'मला नको! पण लवकर या हं!'

दोघेहीं निघालीं. एकांतवासाचा प्रेमानंद त्यांना मिळाला. हृदयाविष्करणाच्या प्रथमावस्थेला त्यांनीं सुरवात केली. हृदयाला हृदयाची प्रस्तावना मिळाली आणि त्याच वेळीं मीलनाच्या कादंबरीला सुरवात झाली.

बेळगांव स्टेशनवर विनयचा मित्र शशीकान्त त्याला रिसीव्ह करण्यास आला होता. प्लाटफॉर्मवर त्याचें सामान काढलें त्याबरोबर शशीकांत त्यास म्हणाला, 'हमालाला मोटारींत ठेवूं दे. चल, तोंपर्यंत आपण चहा घेऊं.'

पण विनयचें लक्ष त्याच्याकडे नव्हतें. नीलेचें सामान खालीं काढण्यास तो तिला मदत करीत होता.

'बरं. येतों मीं! ओळखदेख असूं द्या! मुंबईस भेटालच!' सर्व सामान खालीं काढल्यावर विनयनें सुरवात केली. 'बरं आहे. येतों मी?' असें म्हणून विनयनें नीलेच्या वडिलांकडे पाहिल्यासारखं केलं.

'परवां येणार ना आमच्या घरीं?'

'पाहूं या!' मनांत असतांनासुद्धां तो अडखळला.

'तें कांहीं नाहीं! आलं पाहिजे,—नाहींतर अं मी—!' असें म्हणून नीलेनें असा कांहीं अविर्भाव करून विनयकडे पाहिलें कीं त्याला आमंत्रणास होकार द्यावा लागला.

अशा रीतीनें सुरवात झालेल्या कादंबरीचीं प्रकरणें दोन वर्षांत अनेकदां उलटलीं गेलीं. आणि त्याच कादंबरीचीं तींच पानें विनय आजही आगगाडींत एकटा बसला असतांना पुन्हां पुन्हां चाळीत होता. त्याला वाईट वाटत होतें कीं आपण घरीं गेल्यावर याच कादंबरीचा शेवट आपलेच वडिल शोकपर्यवासी करणार. 'कुठली मुलगी वडिलांनीं पसंत केली असेल देव जाणे.'—तो मनांत विचार करी.—'आणि ती कितीही चांगली असली तरी नीलेची योग्यता तिला खास प्राप्त होणार नाहीं'

विचारामुळें त्याच्या मनास स्वास्थ्य मिळत नव्हतें. वाचावें म्हणून त्यानें कादंबरी घेतली पण वाचनांत त्याचें मन रमेना. झोंपावें म्हणून त्यानें प्रयत्न केला, पण तो निष्फळ ठरला.

त्याला नीला आवडली. नीलेला तो प्रिय होता. मुंबईच्या स्वच्छंद वातावरणांतील नीलेच्या सहवासांतील कोमल व मृदु लहरी त्याच्या मनास आनंदीत करीत होत्या तर तिकडे नीला विनयबरोबरच्या सुखाच्या भवितव्यतेचीं काल्पनिक चित्रें रंगविण्यांत तल्लीन होऊन गेली होती.

मुंबईस असतांना दोघांचा सहवास एकमेकांना भरपूर आनंद देत होता. कॉलेज सुटल्याबरोबर नीला विनयच्या खोलीवर येत असे. मग विनय तिच्याबरोबर पांच साडेपांच वाजेपर्यंत गप्पागोष्टी करी. मध्यंतरी चहाचा मधुर स्वाद घेण्यास दोघंही चुकत नसत. साडेपांचच्या मानानं विनय बाहेर फिरावयास जाण्यासाठीं वेषभूषेस लागे आणि दहापंधरा मिनि-टांत ती आटोपताच तीं दोघेंही रेक्लेमेशनच्या बाजूला किंवा कधींतरी हॅंगिंग–गार्डनवर फिरावयास जात. बहुतकाळाच्या सहवासानंतर दोघां-च्याही बोलण्यांत मोकळेपणा वावरत होता व त्यामुळें दोघांनाही एकमेकांचा सहवास निरंतर लाभावा असे वाटत होतें. साडेसातच्या मानानें निस-र्गाची सृष्टीशोभा पाहून आणि वायुलहरीबरोबर स्वच्छंदानें खेळून तीं दोघेंही घरीं परतत. विनय नीलेला तिच्या घरीं पोंहचवी व मग एकटाच आपल्या खोलीवर येई.

थोडक्याच अवधींत विनयनें नीलेची, त्याची बहिण इंदूताईबरोबर ओळख करून दिली; आणि त्यामुळें कधींकधीं शनिवारीं अगर रविवारीं सिनेमाला जातांना इंदूताईही त्यांच्याबरोबर असे.

अशा रीतीनें निरंतर सहवासाचा योग लवकरच येईल अशी विनयची अपेक्षा होती, पण वधूपरीक्षसाठीं वडिलाकडून बोलावणें आल्यामुळें, ती फोल ठरणार याबद्दल विनयला अतोनात वाईट वाटलें. प्रवासांची सर्व रात्र त्यानें विचार करण्यांत व त्यामुळें विनाकारण मस्तकाला शीण देण्यांत घालविली. मधून मधून त्याला बेळगांवच्या प्रवासाची आठवण होई व उगीच मनांत शंका येई कीं, आतांसुद्धां नीला माझ्याबरोबर असती तर हाच माझा प्रवास कितीतरी सुखाचा झाला असता. त्याला वाटे, होईल कां असं ? '

पहांट झाली होती, आणि आगगाडी आपला मार्ग धीमेपणानें आक्रमीत होती. पहाटेचा थंड वारा विनयास आल्हादकारक वाटला आणि त्याच्या मृदुतेमुळे त्याला तात्पुरती झापड लागली. तो त्या विचारांतच झोंपला.

साडे अकराच्या सुमारास तो एकाएकीं जागा झाला. गाडीचा वेग कमी होत होता. ती बीना स्टेशनमध्यें शिरत होती व स्टेशनवरील हमाल, चहावाले वगैरेंची धांवपळ, आरडाओरड त्याला ऐकूं येत होती. बीना स्टेशनमध्यें गाडी शिरताच विनयनें खिडकींतून बाहेर पाहिलें. तो चकीतच झाला.

' नीला–नीला—! ' त्याने हर्षभरित होऊन हांक मारली.

प्लॅटफॉर्मवर किरमिजी रंगाचें पातळ परिधान केलेल्या नीलेनें चमकून तिकडे पाहिलें. तिलाही आश्चर्याचा धक्का बसलासें तिनें दाखविलें.

' अय्या ! तुम्ही इकडे कुणीकडे ? '

' वडिलाची तार आली म्हणून घरीं चाललों. '

' म्हणजे वडिल आजारी वगैरे आहेत कीं काय ? '

' तसं काहीं दिसत नाहीं. काहीं घरगुती कामासाठींच त्यानीं बोल-वलं आहे. पण तूं इकडे कुणीकडे ! '

' चाललें तुमच्याच गावीं. '

' मग चल ना ! सामान ठेव आत. '

हमालाने सामान आत ठेविलें. नीला आणि तिच्या बरोबर असलेला तिचा आतेभाऊ उमल दोघेही आत बसलीं. विनयला आपण रात्रीं केलेल्या विचाराची सार्थता पटली, व नीला भेटलेली पाहून त्यास विशेष आनंद झाला. पण तो क्षणभरच. कारण आपण ग्वाल्हेरला कशासाठीं जातों आहे या गोष्टीची जाणीव त्याला झाली व त्याचे मन उदास बनलें.

' मग आमच्याकडे उतरणार ना तूं ? '

' आमत्रणाशिवाय बरी येईन मी तुमच्या घरीं ? कधींतरी मला बोला-वलत का ? '

' मग आतां चल ना ! माझेही दिवस तिकडे आनंदांत जातील. '

' शाबास ! आयत्या पिठावर रेखोट्या ओढल्यासारखेच नाहीं कां हें ? माझ्या मैत्रिणीनें बोलाविलें म्हणून मी चालले आणि तुम्ही आपले वाहत्या

गंगेंत हात धुवून घेतां. कधींतरी माझी आठवण झाली होती ?'—नीलेनें लटक्या रागानें त्याला चिडविण्यासाठीं म्हटलें.

'नेहमीं होत असते अन् आतांच बीना स्टेशन येण्यापूर्वीं झाली होती.'

'कारण ?'

'कारण माझी दुर्दैवी भवितव्यता! नीले, वधूपरीक्षेसाठीं मी घरीं चाललों आहे.' त्याला फार वाईट वाटलें.

'तर मग आतां यापुढें माझी आठवणसुद्धां होणार नाहीं म्हणायची! मग काय विचारतां ?'

विनयला वाईट वाटलें. आणि नीलेचा थोडा रागही आला. आपण यावेळीं कोणत्या परिस्थितींत आहों याची जाणीव असूनही ही नीला हंसत बागडत आपला उपहास करते आहे याबद्दल त्याला तिच्याविषयीं क्षणिक तिरस्कार उत्पन्न झाला. पण नीलेवर त्याचें निर्व्याज प्रेम होतें–नव्हे ती त्याची होती.

दोघेंही स्तब्ध राहिलीं. विनय विचारांत मग्न होता. नीला काय बोलावें याचा विचार करीत होती.

'मला एक वचन देतां.'

'कसलं ?'

'अगोदर द्या, मग सांगतें!'

'कशाबद्दल तें सांग ना म्हणजे मग देतों.'

'नाहीं तर नकोच! होईल आपोआप!' नीलेनें विषय बदलला. विनयला वाईट वाटलें. कांहीं तरी बोलावें म्हणून तो म्हणाला, 'सांग ना!–बरं हें घे वचन' असें म्हणूनच त्यानें तिचा हात आपल्या हातांत घेतला आणि आपला हात तिच्या तळहातावर ठेवूत हलकेच दाबला.

'––म्हणजे असं कीं लग्न झाल्यावर माझी ओळख करून द्यायची!'

'कुणाबरोबर ?' विनयला तिच्या बोलण्याचा अर्थ उमगला नाहीं.

'कुणाबरोबर म्हणजे ? आपल्या तिच्याबरोबर!' नीला हंसली.

'बरं बरं! तें राहूं द्या सध्यां!' विनय खिन्न झाला.

इतक्यांत ग्वाल्हेर स्टेशन आलें. स्टेशनांत गाडी शिरत असलेली पाहून विनयनें आपलें सामान गुंडाळण्यास सुरवात केली.

गाडी थांबली. विनयने आपलें सामान गाडींत ठेविलें. त्यानें आपण कोणत्या गाडीने निघतों आहों हें कळविलें नसल्यामुळें त्याच्या घराकडून कोणीच आलें नव्हतें. गाडींत बसतां बसतां विनयनें नीलेला तिचा तिकडचा पत्ता विचारला आणि म्हणाला, 'मग येणार ना तूं उद्यां आमच्याकडे ?'

'बरं पाहूं कसे काय योग जुळतात ते ?' नीला हसत हंसत म्हणाली. ती उमलबरोबर आपल्या गाडींत बसली. आणि दोन निरनिराळया परिस्थितींत असलेलीं हृदयें एकमेकापासून अलग झालीं.

तो दिवस विनयनें कसातरी घालविला. आज वधूपरिक्षेचा दिवस. विनयनें कसाबसा चहा घेतला व मोठ्या नाईलाजाने व विषण्ण मन:स्थितींत तो वडिलाबरोबर आपल्या धाकट्या कमलाकरासह वधूच्या घरीं निघाला.

ओटीवरच नीला होती, व तिच्या शेजारींच तिच्याच वयाची दुसरी कोणीतरी मुलगी होती.

'हीच ती मुलगी काय ?—अन् नीलेची चांगलीच ओळख आहे तर! मग नीलेने मला का बरं सांगितले नाहीं ?' विनयच्या मनांत शंका उत्पन्न झाली. त्याच्या नजरेसमोर त्याची भावी वधू बसली होती. तो विचार करूं लागला. एका क्षणांत त्याने दोघींचींहां तुलना केली पण नीलेलाच त्यानें अधिक मार्कस् दिले.

त्याना आलेले पहाताच नीला व तिच्याबरोबरची मुलगी चटकन् आंत निघून गेलीं. जाताना मात्र नीलेला मागें पाहिल्यावाचून रहावलें नाहीं. आंतून एक वृद्ध व बरोबर नीलेचा आतेभाऊ त्यांचें स्वागत करावयास सामोरे आले.

योग्य प्रकारें रघुनाथरावांनीं विनय, त्याचे वडील यांचें स्वागत केलें व सर्व मंडळी आंत दिवाणखान्यांत बसली.

'तुम्हांला माहीतच असेल,' रघुनाथारावांनीं सुरवात केली, 'कीं मी माझ्या पुतणीसाठीं तुमच्या वडिलांजवळ शब्द घातला आणि मला आनंद वाटतो कीं त्यांनीं तो मान्य केला. त्यांची अट एवढीच कीं, मुलगी मुलानें पसंत केली पाहिजे, आणि ती तुम्हांस पसंत पडेल याबद्दल मला संशय नाहीं.'

विनयला थोडें फार समाधान वाटले. ‘ वडिलानीं एवढी तरी अट घातली आहे तर ! कांहीं हरकत नाहीं. मीच मुलगी नापसंत करतों म्हणजे झालं. ’ —विनयच्या मनांत विचार ठरत होते.

‘ बरं मग, बोलवतों हं मुलीला ! ’ असें म्हणून त्यांनीं आपल्या पत्नीस, वधूस बाहेर पाठवून देण्यास सुचविलें. विनयला थोडीफार शांती मिळाली होतीच. विचार सुरूच होते पण लक्ष मात्र दरवाज्याकडे लागलें होतें.

हातांत चहाचा ट्रे घेऊन मुलीनें दिवाखान्यांत प्रवेश केला. एका दृष्टीक्षेपांतच विनयला आश्चर्याचा धक्का बसला. आपण पहातों तें स्वप्न तर नव्हेना असाहि त्यास भास झाला. पण तो धक्का व तो भास आनंदाचा, सुखाचा होता याची जाणीव त्यास ताबडतोब झाली.

‘ ही माझी पुतणी–आप्पासाहेब देशमुखाची मुलगी नीला ! यंदाच बी. ए. ला बसणार. तुम्हास पसंत असल्यास सांगा म्हणजे या परिक्षेचा निकाल तिला अगोदर समजेल. ’

योग्यप्रकारें चहापान झालें. ‘ उद्या काय ते सांगतों ’ असे निमित्त करून विनय तिकडून बाहेर पडला तो थेट घरीं आला. त्याला नीलेचा राग आला होता, पण त्यांत अनुराग होता.

नीलेचें विनयबरोबर लग्न झाल्याच्या दुसऱ्या दिवशीं तीं दोघें चांदण्यांतील मौज पहाण्यास बाहेर पडली.

‘आपल्या वचनाची आठवण आहे ना ? ’ नीलेने हंसत हंसत विचारलें.

‘ हो ! कां बरं ? ’

‘ मग द्या ना माझी ओळख करून तुमच्या पत्नीशीं ! ’

‘ अस्सं काय ! ही घे आतांच देतों.—ही माझी बायको–सहचारिणी बरं कां नीलाबाई देशमुख ! ’ असें म्हणून विनयनें हळूच नीलेच्या गालावर एक टिचकी मारली. आणि—

‘ ही माझी जीवाभावाची मैत्रिण कुमारी नीला देशमुख बरं कां ग ? ’ असें म्हणून त्यानें हळूच तिच्या नाजुक ओष्ठद्वयाचें चुंबन घेतलें.

‘ इश्श ! हें काय बरं असं ? ’ म्हणून नीलेने आपल्या मानेस गोडसा वळसा दिला. —श्री. अवधूत, ता. २५।७।३७.

---